# नवभारत

ऑगस्ट २०१२

श्रीरामरक्षास्तोत्राची रचना - एक विचार

भारतातील सध्याच्या आर्थिक संकटाची रूपरेखा

'नल - दमयंती' स्वयंवर

अभिव्यक्तीच्या स्वातंत्र्याचा गळा घोटणारे राज्यकर्त्यांचे जागतिक षडयंत्र

कुसुमाग्रजांचा साहित्यविचार

ग्रंथसमीक्षण

मराठीचे आधुनिकीकरण (मराठी वृत्तपत्रांचे योगदान)

अनुक्रमणिका








द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊ न आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ् मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डीं.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६५ । अंक ११ । ऑगस्ट २०१२
श्रावण/अधिक भाद्रपद शके १९३४
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका







# नवभारत

## ऑगस्ट २०१२

## अनुक्रमणिका

# श्रीरामरक्षास्तोत्राची रचना – एक विचार

डॉ. म. अ. मेहेंदळे

'श्रीरामरक्षास्तोत्र' हे महाराष्ट्रातील एक लोकप्रिय स्तोत्र आहे. महाराष्ट्राबाहेर या स्तोत्राचा प्रचार आहे की नाही, याची कल्पना नाही. हातात भस्म घेऊन रामरक्षा-स्तोत्राचा पाठ केल्यावर तो अंगारा म्हणून लावल्यास लावणाऱ्याचे इडापीडांपासून रक्षण होते, अशी श्रद्धा आहे; निदान पूर्वीतरी होती. या स्तोत्राचा कर्ता बुधकौशिक हा स्वतःला 'ऋषी' म्हणवीत असल्यामुळे त्याच्या स्तोत्राला वेदांचे प्रामाण्य असल्याचे त्याने कल्पिले आहे; तेव्हा वेदमंत्राप्रमाणेच या स्तोत्राला ऋषिखेरीज देवता, छंद आणि विनियोग असायला हवेत. बुधकौशिकाने ते अनुक्रमे 'सीतारामचंद्र देवता', 'अनुष्टुभ छंद' आणि 'जप' (विनियोगः) असे सांगितले आहेत.

सुरुवातीच्या ध्यानपर श्लोकात राम हा 'आजानुबाहु' असल्याचे म्हटले आहे. त्याचे हात असे थोडे लांब असल्यामुळे त्याला 'बद्धपद्मासन' घालून बसणे अवघड वाटले नसावे. या आसनात साधे 'पद्मासन' घातल्यावर उजवा हात मागे नेऊन त्याने उजव्या पायाचा अंगठा आणि डावा हात मागे नेऊन डाव्या पायाचा अंगठा धरावयाचा असतो. (पहा : व. ग. देवकुळे – योगासने, १९६४, पृ. ४५). या प्रारंभिक ध्यानाविषयीच्या श्लोकात रामाच्या ज्या निरनिराळ्या अवस्था कल्पिल्या आहेत ('आजानुबाहु' म्हणजे उभा असलेला, 'बद्धपद्मासन' म्हणजे आसन घालून बसलेला, वामांकारूढ सीता म्हणजे डावा पाय वर घेऊन मांडी घातलेला आणि उजवा पाय खाली सोडलेला, नानालंकार अंगावर घातलेला आणि केसांच्या जटा बांधलेला), त्या सर्व एकाच वेळच्या असणे शक्य नाही, रामाच्या निरनिराळ्या अवस्थांतले ध्यान करायचे आहे.

रामाचे ध्यान करावयास सांगणारा हा प्रारंभिक श्लोक, तसेच रामचरित्राचे महत्त्व सांगणारे आणि रामाचे थोडे वर्णन करणारे (नीलोत्पलश्याम, राजीवलोचन इत्यादी) असे प्रस्तावनारूप तीन श्लोक झाल्यावर मग चौथ्या श्लोकापासून ('शिरो मे राघवः पातु' इत्यादी) सुरुवात होऊन नवव्या श्लोकापाशी ('पातु रामोऽखिलं वपुः') रामरक्षा संपते. या सहा श्लोकांत सारे रामचरित्र थोडक्यात सांगितले आहे.[म्हणजे राम हा रघुकुलोत्पन्न (राघव) आहे, तो दशरथात्मज आहे हे सांगण्यापासून त्याने रावणाला मारून बिभीषणाला ऐश्वर्य प्राप्त करून दिले इथपर्यंत]. नंतरच्या उपसंहाररूप असलेल्या पाच श्लोकांत ('एतां रामबलोपेतां' पासून 'सर्वत्र लभते जयमंगलम्' १०-१४) रामरक्षेची फलश्रुती सांगितली आहे. शंकराने बुधकौशिक ऋषीस शिकविलेली आणि बुध-कौशिक ऋषीने प्रातःकाळी उठून लिहिलेली रामरक्षा इथे संपते. ('आदिष्टवान् यथा स्वप्ने.......प्रातः प्रबुद्धो बुधकौशिकः' १५).

त्यानंतर 'आरामः कल्पवृक्षाणां....' (१६) इथपासून 'रामो राजमणिः सदा विजयते......' (३७) इथपर्यंतचे श्लोक बुधकौशिक ऋषीने स्वयंप्रज्ञेने रामाच्या स्तुतिपर रचलेले श्लोक आहेत. त्याला फक्त 'रामो दाशरथिः शूरो.....' (२२) पासून 'न ते संसारिणो नराः' (२५) पर्यंतचे चार श्लोक अपवाद आहेत. खरेतर हे चार श्लोक 'आरामः कल्पवृक्षाणां......' या श्लोकाच्या आधी असायला हवे होते. या श्लोकांत शंकराच्या भक्तांनी रामनामाचा जप केल्यास त्यांना अश्वमेधादी यज्ञ केल्याचे पुण्य लाभते, ते संसारात गुरफटून राहत नाहीत (न ते संसारिणो नराः) हे सांगितले आहे. बुधकौशिकाने रचलेल्या रामस्तुतिपर इतर श्लोकांत जसे त्याचे स्वतःविषयीचे उल्लेख आहेत ('नः' १६, १९; 'मम' २०, 'वन्दे' २६, ३१, ३४; 'पतये नमः' २७; 'मम', 'शरणं भव' २८; शरणं प्रपद्ये २९; मत्पिता, मत्सखा, जाने ३०; नमाम्यहम् ३५), तसे इतर श्लोकांत नाहीत. जवळजवळ शेवटचा असलेला 'रामो राजमणिः सदा विजयते' (३७) हा श्लोक लक्षणीय आहे. त्यात 'राम' या नामाची प्रथमेपासून (रामः) संबोधनापर्यंत (हे राम) सर्व आठ रूपे क्रमाने

आली आहेत. श्लोकाच्या ह्या एका विशेषाकडे रामरक्षेचा पाठ म्हणणाऱ्यांचे पूर्वीच लक्ष गेले आहे. त्या श्लोकाचा आणखी एक विशेष आहे; त्याकडे अभ्यासकांचे अद्याप लक्ष गेलेले नाही, असे वाटते. तो विशेष असा की, श्लोकाच्या प्रत्येक चरणाचा पूर्वार्ध रामाला अनुलक्षून आहे. [जसे 'रामो राजमणिः सदा विजयते', 'रामेणाभिहता निशाचरचमूः', 'रामान्नास्ति परायणं परतरं', आणि 'रामे चित्तलयः सदा भवतु (मे)'] तर चरणाचा उत्तरार्ध रामभक्त बुधकौशिकाला अनुलक्षून आहे. [जसे : 'रामं रमेशं भजे', 'रामाय तस्मै नमः,' 'रामस्य दासोऽस्म्यहम्' आणि 'भो (राम) माम् उद्धर'].

'रामो राजमणिः....' या ३७ व्या श्लोकापाशी रामरक्षा संपते. शेवटच्या ३८ व्या श्लोकात (राम रामेति रामेति रमे रामे मनोरमे। सहस्रनाम तत्तुल्यं रामनाम वरानने।।) शंकर पार्वतीला सांगत आहेत की, 'विष्णुसहस्रनामाशी तुल्यबळ असलेल्या एकाच 'राम' नामाचा जप करताना ते अगदी रंगून जातात.'

म्हटलेच तर या 'रामरक्षास्तोत्रा'चा आणखी एक विशेष आहे. स्तोत्रात लक्ष्मणाचा उल्लेख अनेकवार झाला आहे. त्यात आश्चर्य नाही, कारण राम हा मुळी 'लक्ष्मणानुचर' (श्लोक २२) आहे. स्तोत्रात भरताचाही दोनदा उल्लेख आहे ['भरतवन्दित' (६) आणि 'भरताग्रज' (२८)]; परंतु शत्रुघ्नाचा उल्लेख एकदाही झालेला नाही. रामाच्या या भावाकडे परंपरेने दुर्लक्ष केले आहे; असे वाटते.

।।श्रीरामरक्षास्तोत्र।।

श्रीगणेशाय नमः।
अस्य श्रीरामरक्षास्तोत्रमन्त्रस्य।
बुधकौशिक ऋषिः।
श्रीसीतारामचन्द्रो देवता।
अनुष्टुप् छन्दः। सीता शक्तिः।
श्रीमद्धनुमान् कीलकम्।
श्रीरामचन्द्रप्रीत्यर्थे जपे विनियोगः।
अथ ध्यानम्।
ध्यायेदाजानुबाहुं धृतशरनुषम्।
बद्धपद्मासनस्थं।
पीतं वासो वसानं नवकमलदलस्पर्धिनेत्रं प्रसन्नम्।
वामाङ्कारूढसीतामुखकमलमिलल्लोचनं नीरदाभम्।
नानालङ्कारदीप्तं दधतमुरुजटामण्डलं रामचन्द्रम्।
इति ध्यानम्।
चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरम्।
एकैकमक्षरं पुंसां महापातकनाशम्।।
ध्यात्वा नीलोत्पलश्यामं रामं राजीवलोचनम्।
जानकीलक्ष्मणोपेतं जटामुकुटमण्डितम्।। २।।
सासितूणधनुर्बाणपाणिं नक्तंचरान्तकम्।
स्वलीलया जगत्त्रातुमाविर्भूतमजं विभुम्।।३।।
रामरक्षां पठेत् प्राज्ञः पापघ्नीं सर्वकामदाम्।
शिरो मे राघवः पातु भालं दशरथात्मजः।।४।।
कौसल्येयो दृशौ पातु विश्वामित्रप्रियः श्रुती।
घ्राणं पातु मखत्राता मुखं सौमित्रिवत्सलः।।५।।
जिह्वां विद्यानिधिः पातु कण्ठं भरतवन्दितः।
स्कन्धौ दिव्यायुधः पातु भुजौ भग्नेशकार्मुकः।।६।।
करौ सीतापतिः पातु हृदयं जामदग्न्यजित्।
मध्यं पातु खरध्वंसी नाभिं जाम्बवदाश्रयः।।७।।
सुग्रीवेशः कटी पातु सक्थिनी हनुमत्प्रभुः।
ऊरू रघूत्तमः पातु रक्षःकुलविनाशकृत्।।८।।
जानुनी सेतुकृत् पातु जङ्घे दशमुखान्तकः।
पादौ बिभीषणश्रीदः पातु रामोऽखिलं वपुः।।९।।
एतां रामबलोपेतां रक्षां यः सुकृती पठेत्।
स चिरायुः सुखी पुत्री विजयी विनयी भवेत्।।१०।।
पातालभूतलव्योम चारिणश्छद्मचारिणः।
न द्रष्टुमपि शक्तास्ते रक्षितं रामनामभिः।।११।।
रामेति रामभद्रेति रामचन्द्रेति वा स्मरन्।
नरो न लिप्यते पापैर्भुक्तिं मुक्तिं च विन्दति।।१२।।
जगज्जैत्रेकमन्त्रेण रामनाम्नाऽभिरक्षितम्।
यः कण्ठे धारयेत्तस्य करस्थाः सर्वसिद्धयः।।१३।।
वज्रपञ्जरनामेदं यो रामकवचं स्मरेत्।
अव्याहताज्ञः सर्वत्र लभते जयमङ्गलम्।।१४।।
आदिष्टवान् यथा स्वप्ने रामरक्षामिमां हरः।
तथा लिखितवान् प्रातः प्रबुद्धो बुधकौशिकः।।१५।।
आरामः कल्पवृक्षाणां विरामः सकलापदाम्।
अभिरामस्त्रिलोकानां रामः श्रीमान् स नः प्रभुः।।१६।।
तरुणौ रूपसंपन्नौ सुकुमारौ महाबलौ।






पुण्डरीकविशालाक्षौ चीरकृष्णाजिनाम्बरौ।।१७।।
फलमूलाशिनौ दान्तौ तापसौ ब्रह्मचारिणौ।
पुत्रौ दशरथस्यैतौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ।।१८।।
शरण्यौ सर्वसत्त्वांना श्रेष्ठौ सर्वधनुष्मताम्।
रक्षःकुलनिहन्तारौ त्रायेतां नो रघूत्तमौ।।१९।।
आत्तसज्जधनुषाविषुस्पृशावक्षयाशुगनिषङ्गसङ्गिनौ।
रक्षणाय मम रामलक्ष्मणावग्रतः पथि सदैव
गच्छताम्।।२०।।
संनद्धः कवची खड्गी चापबाणधरो युवा।
गच्छन् मनोरथोऽस्माकं रामः पातु सलक्ष्मणः।।२१।।
रामो दाशरथिः शूरो लक्ष्मणानुचरो बली।
काकुत्स्थः पुरुषः पूर्णः कौसल्येयो रघूत्तमः।।२२।।
वेदान्तवेद्यो यज्ञेशः पुराणपुरुषोत्तमः।।
जानकीवल्लभः श्रीमानप्रमेयपराक्रमः।।२३।।
इत्येतानि जपेन् नित्यं मद्भक्तः श्रद्धयान्वितः।
अश्वमेधाधिकं पुण्यं संप्राप्नोति न संशयः।।२४।।
रामं दूर्वादलश्यामं पद्माक्षं पीतवाससम्।
स्तुवन्ति नामभिर्दिव्यैर् न ते संसारिणो नराः।।२५।।
रामलक्ष्मणपूर्वजं रघुवरं सीतापतिं सुन्दरम्।
काकुत्स्थं करुणार्णवं गुणनिधिं विप्रप्रियं धार्मिकम्।
राजेन्द्रं सत्यसन्धं दशरथतनयं श्यामलं शान्तमूर्तिं।
वन्दे लोकाभिरामं रघुकुलतिलकं राघवं रावणारिम्।।२६।।
रामाय रामभद्राय रामचन्द्राय वेधसे।
रघुनाथाय नाथाय सीतायाः पतये नमः।।२७।।
श्रीराम राम रघुनन्दन राम राम ।
श्रीराम राम भरताग्रज राम राम।
श्रीराम राम रणकर्कश राम राम।
श्रीराम राम शरणं भव राम राम।।२८।।
श्रीरामचन्द्रचरणौ मनसा स्मरामि।
श्रीरामचन्द्रचरणौ वचसा गृणामि।
श्रीरामचन्द्रचरणौ शिरसा नमामि।
श्रीरामचन्द्रचरणौ शरणं प्रपद्ये।।२९।।
माता रामो मत्पिता रामचन्द्रः।
स्वामी रामो मत्सखा रामचन्द्रः।
सर्वस्वं मे रामचन्द्रो दयालुर्
नान्यं जाने नैव जाने न जाने।।३०।।
दक्षिणे लक्ष्मणो यस्य वामे तु जनकात्मजा।
पुरतो मारुतिर्यस्य तं वन्दे रघुनन्दनम्।।३१।।
लोकाभिरामं रणरङ्गधीरं राजीवनेत्रं रघुवंशनाथम्।
कारुण्यरूपं करुणाकरं तं श्रीरामचन्द्रं शरणं प्रपद्ये।।३२।।
मनोजवं मारुततुल्यवेगं जितेन्द्रियं बुद्धिमतां वरिष्ठम्।
वातात्मजं वानरयूथमुख्यं श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये।।३३।।
कूजन्तं रामरामेति मधुरं मधुराक्षरम्।
आरुह्य कविताशाखां वन्दे वाल्मीकिकोकिलम्।।३४।।
आपदामपहर्तारं दातारं सर्वसंपदाम्।
लोकाभिरामं श्रीरामं भूयो भूयो नमाम्यहम्।।३५।।
भर्जनं भवबीजानामर्जनं सुखसंपदाम्।
तर्जनं यमदूतानां रामोरामेति गर्जनम्।।३६।।
*रामो* राजमणिः सदा विजयते *रामं* रमेशं भजे।
*रामेणा*भिहता निशारचमू *रामाय* तस्मै नमः।
*रामान्ना*स्ति परायणं परतरं *रामस्य* दासोऽस्म्यहम्।
*रामे* चित्तलयः सदा भवतु मे भो *राम* मामुद्धर।।३८।।
रामरामेति रामेति रमे रामे मनोरमे।
सहस्त्रनाम तत्तुल्यं रामनाम वरानने।। ३८।।
इति श्रीबुधकौशिकविरचितं श्रीरामरक्षास्तोत्रं संपूर्णम्।
।। श्रीसीतारामचन्द्रार्पणमस्तु।।

☆☆☆

# भारतातील सध्याच्या आर्थिक संकटाची रूपरेखा

प्रा. सी. पं. खेर

भारताच्या सध्याच्या (२०१२) आर्थिक संकटाचे व्यवच्छेदक लक्षण रुपयाचे डॉलरमधील घसरते मूल्य, हे मानले जाते. ५ एप्रिल २०११ रोजी ४४.४२ रुपयास १ डॉलर मिळावयाचा. त्यास २१ मे २०१२ रोजी ५५.३८ रुपये मोजावे लागले. याची अनेक कारणे सांगितली जातात. १) राजकोषीय महसुली चालू व सम्रग तूट, २) प्रतिकूल विदेशी व्यापार शेष, ३) विदेशीयांनी काढून नेलेली गुंतवणूक, ४) अमेरिका आणि युरोपियन देशांना लागलेला कर्जाचा विळखा, ५) बेजबाबदार, स्वार्थी (स्वतःचा व फक्त आपल्याच राज्याचा) विचार, आणि केव्हाही पाठीत खंजीर खुपसणाऱ्या पक्षांना बरोबर घेऊन सरकार स्थापल्याने थेट कसलाच निर्णय घेऊ न शकणारा, सरकारला आलेला न निर्णयाचा पक्षाघात, व ६) विरोधी पक्षीयांचे अडवणुकीचे, कोल्हेकुई करण्याचे, बोलणी फिरविण्याचे, केवळ बघत बसण्याचे राजकारण. या कारणांची चिकित्सा करण्याचा या लेखाचा प्रयत्न आहे.

१

केंद्र सरकारची महसुली तूट (महसुली खर्च उणे महसुली जमा, तक्ता क्र.१) २००७-०८ च्या तुलनेत २०१०-११ त वाढत राहिली आहे (एकूण ४४४७ अब्ज रुपये). या वाढीत व्यवस्थापन, हस्तांतरण यांवरील खर्चात एकूण वाढीच्या ६३ टक्के वाढ झालेली आढळते. व्याज आणि अर्थसाहाय्य यांतून प्रत्येकी १४ टक्के, तर संरक्षणखर्चावरील वाढ ९ टक्क्याने झाली. महसुली तूट भरून काढण्यासाठी २४२१ अब्ज रुपयांचे जास्तीचे कर्ज उभे करावे लागले. त्यामुळे साहजिकच व्याज देणे वाढले. अर्थसाहाय्यातही (सब्सिडी) ६३७ अब्ज रुपयांची वाढ झाली. अर्थसाहाय्य करण्याचे प्रमाण कमी करावे अशी सर्वत्र हाकाटी सुरू आहे, आणि हा राजकारणाचा भाग बनला आहे.

व्यवस्थापनखर्च कमी करण्याचे कुणीच बोलत नाही. उलट, सहाव्या वित्त आयोगाने नोकरदारांचे पगार भरमसाठ वाढवून ठेवले. या आयोगाची सुट्या कमी करण्याची शिफारस होती. ती कुणीच जुमानली नाही. वेतन वाढले त्या मानाने कार्यक्षमतेत काही फरक पडला नाही. [भाववाढीचे हे एक कारण कुणीच लक्षात घेत असलेले दिसत नाही. तीनेक वर्षांत समग्र उपभोगावरील (सरकारी व खासगी) खर्चात १०३० अब्ज रुपयांची वाढ झाली.] अर्थसाहाय्याचे सविस्तरपणे [१] जे वेगळे आकडे मिळतात, ते अर्थसंकल्पातील संख्येपेक्षा भिन्न व जास्त आहेत. म्हणजे अर्थसंकल्पाबाहेरूनही अर्थसाहाय्य दिले गेले आहे. त्यानुसार अर्थसाहाय्याचे प्रमाण पुढीलप्रमाणे मिळते.

अर्थसाहाय्याचा तपशील (टक्के)

| बाब | २००७-०८ | २०११-१२ (सुधारित अंदाज) | २०१२-१३ (अपेक्षित अंदाज) |
|---|---|---|---|
| अन्न | ४४.१७ | ३३.६७ | ३९.४७ |
| खते | ४५.८० | ३१.०६ | ३२.०९ |
| पेट्रोलियम पदार्थ | ३.९८ | ३१.६६ | २३.९८ |
| अन्य | ६.०५ | ३.६१ | ४.४६ |
| | १००.०० | १००.०० | १००.०० |

अर्थसाहाय्यातील मोठा दोष हा आहे, की ते ज्यांच्यासाठी द्यावयाचे अपेक्षित आहे, ते त्यांच्यापर्यंत पोचतच नाही; मधल्यामध्ये हावरट संधिसाधू मध्यस्थ (रेशन दुकानदार, व्यापारी व राजकारणीही) ते लाटताना आढळतात.

शेतकऱ्यांना धान्योत्पादनाची किमान किंमत मिळावी, त्यांना नुकसान सोसावे लागू नये आणि गरिबांना स्वस्तात धान्य मिळावे, व या किंमतीतील फरक अन्नासाठीच्या अर्थसाहाय्याचा हेतू आहे. तसेच जरुरीची खते शेतकऱ्यांनी खरेदी करावीत म्हणूनही खरेदी-विक्रीतील फरक

१. ही सांख्यिकी इकॉनॉमिक सर्व्हे २०१०-११ व ११-१२ यांतील तिसऱ्या प्रकरणातून घेतलेली आहे.



अनुक्रमणिका

खतांवरील अर्थसाहाय्याने भरून काढण्याचा सरकारचा प्रयत्न आहे.

पेट्रोलियम पदार्थांवरील अर्थसाहाय्य कमी केले पाहिजे, अशी अर्थशास्त्रज्ञांची मागणी आहे. यावरील अर्थसाहाय्याचे प्रमाण २००७-०८ मधील एकूण अर्थ-साहाय्याच्या ३.९८ टक्क्यांवरून २०११-१२ मध्ये (सुधारित अंदाज) ३१.६६ टक्क्यांवर येऊन ठेपले होते.

हे अर्थसाहाय्य कमी करण्यासाठी तीन कारणे दिली गेली आहेत–

१) आंतरराष्ट्रीय तुलनेत पेट्रोल व डिझेल यांच्या किंमती – केंद्र आणि राज्ये बऱ्याच प्रमाणात कर लादत असल्याने – चढत आहेत. कर कमी करण्यास केंद्राने काही प्रमाणात सुरुवात केली असली, तरी बऱ्याच राज्यांनी त्यास विरोध दर्शविला आहे. कारण त्यामुळे त्यांचा महसूल कमी होतो. केंद्र व राज्यांचा अप्रत्यक्ष करावर प्रत्यक्ष कराइतकाच भर आहे.

२) अप्रत्यक्ष करांचा आणि पेट्रोलियम पदार्थांच्या चढ किंमतीचा भार शहरी आणि ग्रामीण जनतेवर सारखाच पडतो. पण त्यांच्या मिळकतीच्या मानाने ग्रामीण जनतेवरील भाराचे प्रमाण अधिक आहे. अर्थसाहाय्यापेक्षा अप्रत्यक्ष करांचे प्रमाण जास्त असल्याने जनतेचे नुकसान होत राहते. शिवाय एकूण भाववृद्धीस चालना मिळते.

३) पेट्रोलियम पदार्थांच्या चढ किंमती शहरी नवश्रीमंत व मध्यम मध्यमवर्गास सोसाव्या लागतात. या वर्गाचा आवाज बुलंद असल्याने आंतरराष्ट्रीय दर चढत राहिले तरी (अर्थसाहाय्य देऊन) ते कमी राखावेत, अशी त्याची मागणी आहे.

हा नवश्रीमंत वर्ग वाहन वापरण्याचे प्रमाण कमी करण्यास तयार असत नाही. वास्तविक, चार लोकांच्या सहभागाने, खर्च वाटून घेऊन वाहनाचा वापर केल्यास पेट्रोलची मागणी कमी करता येणे शक्य आहे. (क्वचित् तसे होतही आहे.)

जळणासाठी ग्रामीण भागात रॉकेलचा प्रामुख्याने वापर होत असल्याने त्याच्या किंमती कमी (लिटरला ३०.५३ रु.) राखल्या गेल्या आहेत, असे म्हटले जाते. याबद्दल शंका व्यक्त होत आहे. रेशन दुकानातून पुरविले जाणारे रॉकेल निम्म्याने (४० ते ५० टक्के) पेट्रोलच्या भेसळीसाठी पुरविले जाते, असा संशय आहे. घरांतून दिव्यासाठी रॉकेल वापरल्याने प्रदूषण वाढते. तेव्हा त्याऐवजी सौर-ऊर्जेचा वापर करता येईल का, याचा पर्यायी विचार केला जावा असे सुचविले गेले आहे.[२] याचा गंभीरपणे विचार व्हावयास हवा.

डिझेल, घरगुती गॅस व रॉकेल यांच्या किंमती राजकीय कारणासाठी कमी राखल्या जात आहेत.[३] यामुळे तेलवितरक कंपन्यांचे (इंडियन ऑइल, हिंदुस्थान पेट्रोलि-यम आणि भारत पेट्रोलियम) नुकसान होऊ नये, म्हणून अर्थसाहाय्य देणे भाग पडत आहे.

'बिझनेस लाइन' या नियतकालिकाच्या एका वृत्तानुसार वरील तीन विक्री व वितरक कंपन्यांचे आतबट्ट्याचे (खरेदीखर्च उणे अप्रत्यक्ष करासह विक्रीतून मिळालेल्या रकमा) आकडे पुढीलप्रमाणे आहेत.[४] :

| बाब | २०१०-११ | २०११-१२ (अब्ज रुपयांत) |
|---|---|---|
| डिझेल | ३४७ | ८१२ |
| रॉकेल | १९५ | २७३ |
| गॅस | २१८ | ३०० |
| पेट्रोल | २२ | – |
| एकूण (२५ जून २०१० पर्यंत) | ७८२ | १३८५* |

* यातील ८३५ सरकारने उचलले व सार्वजनिक तेल उत्पादक कंपन्यांनी म्हणजे ओ.एन्.जी.सी., ओ.आय्. एल्. व जी.ए.आय्. एल्.या कंपन्यानी ५५० उचलले.

या तीन कंपन्यांना दरांच्या आतबट्ट्यामुळे (अंडर-रिकव्हरीज) खरोखरच नुकसान होत आहे का; का त्या

२. पचौडी यांच्या १२ जून २०१२ च्या इकॉनॉमिक टाइम्समधील लेखात उद्धृत.

३. उदाहरणार्थ, १६ जून २०११ रोजीची डिझेलची किंमत लिटरला (१२.५३ रु. ऐवजी) १०.२०रु;रॉकेल लिटरला ३०.५३ रु. तर घरगुती गॅसची सिलिंडरला ३९६ रु. राखावी लागली होती. परिणामी या तीन कंपन्यांना रोजचा ४४६ कोटी रुपये आतबट्टा सोसावा लागला होता.

४. गुगलवरून.








एरवी फायद्यात चालत आहेत, असा एक प्रश्न उपस्थित करण्यात आला आहे.

होय! तीन उत्पादक कंपन्यांनी २०११-१२ त ८३३० अब्ज रु. उलाढालीवर ६१ अब्ज रुपयांचा लाभ दाखविला आहे व तो केवळ ०.७ टक्के भरतो. तो क्षुल्लक आहे. सरकारने तेल वितरक कंपन्यांचा आतबट्टा उचलला म्हणून तेलउत्पादक कंपन्यांचा लाभ दिसतो. पण सरकारचे हे अर्थसाहाय्य जर तेलउत्पादक कंपन्यांना उचलण्यास भाग पाडले, तर तेल उत्पादक कंपन्या (८३५-६१ अब्ज रु. = ७७४ अब्ज रुपयांच्या) नुकसानीत असल्याचे दिसेल.

यावर आम जनता वापरीत असलेल्या रॉकेलवरील अर्थसाहाय्य काही काळ चालू ठेवून निदान घरगुती गॅस व डिझेलचा व्यवहार व्यापारी पद्धतीने, बाजारात खुले-पणाने चालू द्यावा, असा अर्थवेत्त्यांनी उपाय सुचविला आहे. तो कधी अमलात येतो, हे पाहावयास हवे.

अर्थसाहाय्य आणि व्यवस्थापन खर्च कमी करण्यास वाव आहे. त्यामुळे महसुली तूट व ती भरून काढण्यासाठी उभे करावे लागणारे कर्जाचे प्रमाण घटवण्यास त्याची मदत होऊ शकेल.

२

१. विदेशी येण्यादेण्याच्या सांख्यिकीवरून (तक्ता क्र.२) असे दिसते, की व्यापारी देणेबाकी २००७-०८ मधील ९१ अब्ज डॉलरवरून २०१०-११ (प्राथमिक अंदाज) १३१ अब्ज डॉलरपर्यंत वाढत राहिली आहे. परिणामी चालू खात्यावरील तूट वाढत आहे.

२. भांडवल खात्यावरील जमा घटली असून ती अमेरिका, युरोझोनवरील वित्तीय संकटांचा परिणाम आहे.

अमेरिकेला ऑगस्ट २००७ पासून वित्तीय अरिष्टाने घेरले आहे. अमेरिकन गुंतवणूक बँकांनी, त्यांना अधिकाधिक नफा मिळवण्याची हाव सुटल्यामुळे, बँकांवर फेडरल रिझर्व या मध्यवर्ती बँकेने कसलेच नियमन नियंत्रण न ठेवल्यामुळे, बेदरकारपणे, कसल्याही तारणा-शिवाय गृहकर्जे दिली. एवढेच नव्हे, तर कर्जखतांचे शेअर्स करून ते बाजारात विकले, या शेअर्सवर पुन्हा कर्जे दिली व गोत्यात आले. त्यात लेहमन ब्रदर्स या बँकेने दिवाळे जाहीर केले. सारी वित्तीय व्यवस्था ढासळली.

यापुढे अमेरिका कर्जांच्या विळख्यात अडकली. मार्च २०११ च्या अखेरीस केंद्र सरकारला कर्ज उभारण्यास जी १४२७० अब्ज डॉलर्सची मर्यादा दिली होती, ती पूर्णपणे गाठली गेली होती.[५] आणखी कर्ज उभारल्याशिवाय पगार, पेन्शन, कर्ज व व्याजाचे हप्ते देणे, आरोग्य, शिक्षण अशा समाजकल्याणकारक सुविधांवर विनियोग करणे अशक्य होते. पण मोठ्या मिनतवारीने सालिना १५० अब्ज महसुली खर्च कमी करण्याच्या (म्हणजे महसुली तूट कमी करण्यांच्या) अटीवर कर्ज वाढविण्यास परवानगी दिली.

अमेरिकेची राजकोषीय तूट २०११ च्या अंदाज-पत्रकाप्रमाणे १५५० अब्ज डॉलर्स (म्हणजे स्थूल राष्ट्रांतर्गत उत्पादिताच्या १०.६ टक्के) एवढी होती.

युरोपच्या युरो (चलन) प्रदेशातील १७ देशांची आर्थिक स्थितीही खालावलेली आहे. त्यांतील काही देशांची उपलब्ध सांख्यिकी पुढीलप्रमाणे होती.[६]

---

५.

| | |
|---|---|
| चीन | ११४४.९ अब्ज डॉलर्स |
| जपान | ९०७.९ अब्ज डॉलर्स |
| ब्रिटन | ३२५.२ अब्ज डॉलर्स |
| तेलनिर्यातक देश | २२२.३ अब्ज डॉलर्स |
| अन्य देश | १८७८.९ अब्ज डॉलर्स |
| एकूण | ४४७९.२ अब्ज डॉलर्स |

एवढे कर्जरोखे विक्रीस काढले त्यांत खालील कोष्टकात दिल्याप्रमाणे विदेशीयांची ३१.३९ टक्के गुंतवणूक होती. ते हे रोखे केव्हाही विक्रीस काढण्याचा धोका होता. पण ही शक्यता कमी होती. कारण डॉलरवर जगाचा विश्वास होता/आहे.

६. गुगलवरून ही सांख्यिकी आर. एफ. आय.ने दिलेली २००९ ची आहे.

| देश | राजकोषीय तुटीचे प्रमाण (टक्के) | कर्जांचे स्थूल राष्ट्रांतर्गत उत्पादिताशी प्रमाण | बेकारीचे प्रमाण |
|---|---|---|---|
| ग्रीस | १२.७ | १२५[७] | ९.७ |
| स्पेन | ११.४ | ६६.३ | ११.५ |
| पोर्तुगाल | ९.३ | ८४.६ | १०.४ |
| इटली | ५.३ | ११५.८ | १०.० |
| आयर्लंड | १४.७ | ८२.९ | १०.० |
| जर्मनी | ५.५ | ७६.० | ८.६ |
| फ्रांस | ८.२ | ८३.२ | १०.० |
| ब्रिटन | १२.७ | ८०.३ | ७.८ |

युरोपीय एक-चलन (युरो) संघ जेव्हा स्थापन झाला, तेव्हा संघातल्या देशांनी राजकोषीय तूट स्थूल राष्ट्रांतर्गत उत्पादिताच्या ३ टक्के, सार्वजनिक कर्जाचे प्रमाण ६० टक्के या मर्यादेत राखले पाहिजे, असे ठरविले गेले होते ; पण हे या देशांना पाळता आलेले नाही.

युरोपीय संघापुढे आजचा एकमेव प्रमुख प्रश्न आहे, प्रथम ग्रीसला कर्जाच्या विळख्यातून कसे बाहेर काढावयाचे हा. कारण तसे काढले नाही, तर ग्रीसला कर्ज फेडता न आल्यामुळे युरोपीय संघातील बँकांना चांगलाच फटका बसणार आहे. शिवाय यु.सं.ही फुटला जाण्याची शक्यता आहे.

ग्रीसला वाचविण्यासाठी २०१० मध्ये युरोपियन संघ व आंतरराष्ट्रीय नाणेनिधी यांनी संयुक्तपणे तीन वर्षांच्या अवधीत ११० अब्ज युरोचे कर्ज देऊ केले होते. त्यापैकी ३० अब्ज युरोचा हप्ता नाणेनिधीने संमत केला होता. पण त्यासाठी महत्त्वाची अट अशी होती, की ग्रीसने राजकोषीय तुटीचे प्रमाण कमी करावयास हवे. याचा अर्थ मोठ्या प्रमाणाने ग्रीसने काटकसर–किमान मजुरीत, निवृत्तिवेतनात आणि बेकारभत्त्यात घट–करावयास हवी.

अशा काटकसरीचा तिटकारा ग्रीसच्या जनतेस आलेला होता. यामुळे तिथे राजकीय पक्षांतून दंगेधोपे सुरू झाले होते. परिणामी विदेशीयांनी व जनतेनेही मोठ्या प्रमाणाने ठेवी काढून घेण्यासाठी बँकांवर धाडी घालण्यास सुरुवात केली होती.

तेव्हा आणखी १३० अब्ज युरोचे कर्ज ग्रीसला द्यावे लागणार होते.[८] यास जर्मनीचा विरोध होता. एवढे कर्ज घ्यावयाचे का, असा पेच ग्रीस जनतेसमोर होता (त्यांचा काटकारीला तीव्र विरोध होता.). १९ जून २०१२ मध्ये ग्रीसमध्ये निवडणुका व्हावयाच्या होत्या. त्यात असे कर्ज घ्यावयाचे की नाही, हाच प्रमुख मुद्दा होता. त्यात कर्जाला अनुकूल असणाऱ्या पक्षाची सरशी (अगदी थोड्या मताने) झाली आहे. यापुढे काय होते, हे पाहावयास हवे.

स्पेन, पोर्तुगाल व इटली हे देशही कर्जाच्या विळख्यात अडकले गेले आहेत. त्यात स्पेनला १०० अब्ज युरोचे कर्ज यु.सं.ने तत्काळ देऊ केले आहे.

अमेरिकन आणि यु.संच्या वित्तीय अरिष्टचा थोडा-तरी परिणाम भारतीय अर्थव्यवहारावर होणार, हे उघड आहे. तीन मार्गांनी–निर्यात कमी व त्यामुळे डॉलरचे उत्पन्न कमी होण्याने, विदेशी गुंतवणूक घटल्याने व रुपयाचे डॉलरच्या तुलनेत मूल्य कमी होण्याने – हा परिणाम होऊ शकतो.

३

सरकारचा अर्थव्यवहार योग्य मार्गाने होत आहे की नाही, हे जाणण्याचे दोन निकष आहेत. एक, महसुली तुटीचे प्रमाण जोखण्याचा. जितकी तूट अधिक तितका अर्थव्यवहार आतबट्ट्याचा. एकतर कर व करेतर उत्पन्न वाढवा, नाहीतर विनियोग (अर्थसाहाय्य, संरक्षण व व्याज व्यवस्थापन यांवरील खर्च) कमी करा. दुसरा, एकूण विनियोगाचे (महसुली व भांडवली खर्च) स्थूल राष्ट्रांतर्गत उत्पादिताशी प्रमाण – राजकोषीय तुटीचे स्थू. रा. उ. शी. प्रमाण. सध्या हा निकषच जगभर वापरला जात आहे.या निकषानुसार केंद्र सरकारच्या राजकोषीय तुटीचे प्रमाण तक्ता क्र.३ मध्ये नमूद केले आहे.

७. १२ मे २०१२ च्या 'इकॉनॉमिस्ट' नुसार ग्रीसच्या कर्जाचे प्रमाण २०१३ पर्यंत स्थू. रा. उ. च्या १६१ टक्के वाढण्याचा अंदाज आहे. (पहा पृ.९– युरोप्स ॲचीलिस हील.)

८. आंतराष्ट्रीय नाणेनिधी हे कर्ज देणार. ग्रीसचा निधीच्या भांडवलात जेवढा हिस्सा आहे, त्याच्या ३२०० टक्क्यांहूनही अधिक ही रक्कम भरते. ते नियमाविरुद्ध असले, तरी ग्रीस यु. सं. त आहे म्हणूनच ते संमत झाले आहे.










या निकषानुसार केंद्र सरकारच्या राजकोषीय तुटीचे प्रमाण तक्ता क्र.३ मध्ये नमूद केले आहे. ते २००८-०९ सालापासून वाढत राहिले आहे. स्थ. रा. उ. वाढीचे प्रमाणही कमी होताना आढळते आहे. ते २००७-०८ मधील ९.३ टक्क्यांवरून २०११-१२ त ५.१ टक्क्यांवर येऊन ठेपले. या घसरीची काही प्रमुख कारणे पुढील-प्रमाणे सांगितली गेली आहेत.–

१. यंत्रनिर्मिती उद्योगाची वाढ [अवरोधी वृद्धीच्या (स्टॅगफ्लेशन) वातावरणामुळे ] खुंटली आहे. नवी गुंतवणूक करण्यास कसले प्रोत्साहन राहिले नाही. कारण :

अ) अस्तित्वातले मजूर कायदे अलवचीक, साचेबंद राहिले आहेत. ते रोजगार वाढविण्यापेक्षा मजुरांचे रक्षण करण्याकडे लक्ष पुरवीत आहेत. त्यासाठी केंद्र सरकारचे ४७ तर राज्य सरकारांचे १५७ नियामक कायदे आहेत. मजूरकायदे लवचीक करणे बदलत्या परिस्थितीत आवश्यक आहे.

ब) भू-संपादन क्लिष्ट आहे. संपादिलेल्या जमिनीस बाजारभाव मिळत नाही. ज्याची जमीन संपादन केली, त्याचे उदरनिर्वाहाचे साधन हिरावून घेतले जाते. तसे न करता, जमीन दीर्घ मुदतीने भाड्याने घेतली जावी, जमीनमालकास उद्योगात भाग मिळावा, काम मिळावे अशा काही सूचना आहेत. त्या दृष्टीने विचार करून कायद्यात बदल व्हावा. भूसंपादन सरकारने न करता उद्योगास बाजारभावाने विकत घेण्यास मुभा ठेवावी.

क) व्याजाचे दर चढ आहेत. भाववृद्धीस आळा घालण्यासाठी, उपभोगावरील विनियोग कमी राखण्यासाठी व व्यवस्थेतील चलनाचा सुळसुळाट कमी करण्यासाठी, बचतीचे प्रमाण वाढविण्यासाठी ते आणखी काही काळ चढ राखावे लागत आहेत. पण आयकरात किंवा उद्योग उभारल्यावर उद्योगांना व्याजात सूट देऊन यातून मार्ग काढणे शक्य आहे.

२. आर्थिक सुधारणा करण्यास सरकार धजावताना दिसत नाही. काही निर्णय घेतले तर त्यात लाचखोरीचे पाणी मुरत आहे, अशी कोल्हेकुई (बिगरपुराव्यानेही) सर्वजण (विरोधी पक्ष आधी) करीत राहतात. असे खरेखोटे आरोप होऊ नयेत म्हणून निर्णय घेण्याचे धैर्य शासकीय अधिकारी दाखवेनासे झाले आहेत.

लाचखोर किंवा काही आरोप होत असलेल्या व्यक्तींना निवडणुकीचे तिकिट दिले जाऊ नये, एवढीही दक्षता पक्ष घेत नाहीत. आरोप आहेत पण ते कोर्टात सिद्ध झालेले नाहीत, हा विवाद म्हणजे शुद्ध पळवाट आहे. धनवान आणि निवडून येण्याची खात्री एवढेच निकष लावून उमेदवार उभे केले जातात. असे होऊ नये यासाठी निवडणूक कायद्यात बदल करावयास हवा. पण त्यास कोणताच राजकीय पक्ष तयार नाही.

३. प्रत्येक राज्याचा विक्रीकर कायदा, जकातीचे नियम, केंद्राचा आंतरराज्य विक्रीकर, सेवाकर अशा विविध करांचा बोजा व त्यांची क्लिष्टता व्यापारउदीम-वाढीत अडथळा आणीत आहे.

तो घालवून सर्व देशभर एकसारखा माल व सेवा-कर लादला जावा, असा केंद्र सरकारचा प्रस्ताव आहे. पण त्यास राज्यांचा (विशेषतः विरोधी पक्षांची जिथे सरकारे आहेत, त्यांचा) विरोध होत आहे. तो कशा रीतीने निपटता येईल, याचा गंभीरपणे विचार व्हावयास हवा.

४. विदेशी गुंतवणुकीस, विशेषतः किरकोळ व्यापारा-तील त्यांच्या सहभागास विरोधी पक्षांचा तर खरेच, पण संयुक्त आघाडी सरकारात सामील पक्षांचाही विरोध होत आहे. हे बरोबर नाही.

एकतर, किरकोळ व्यापारी म्हणून ज्यांना म्हटले जाते ते छोट्या उत्पादकांना, शेतकऱ्यांना व गिऱ्हाइकांनाही कसे लुबाडीत आहेत, याकडे विरोधी पक्ष दुर्लक्ष करीत आहेत. ते करीत असलेल्या भेसळीची दखल घेत नाहीत. (उदाहरणार्थ, कोथिंबीर, मेथी इ. च्या पेंडीत आतमध्ये बरेच गवत असल्याचे आढळून येते. धान्यांत पुष्कळ खडे मिसळलेले दिसतात.) शिवाय विदेशी गुंतवणूकदार शीतगृहे बांधून माल टिकवण्याचा जो प्रयत्न करतील (किंवा तशी अट घालता येईल), त्यापासून आपण वंचित राहू.

या प्रस्तावात सरकारचीही चूक आहे. हा प्रस्ताव मांडण्यापूर्वी विरोधी पक्षांना विश्वासात घेऊन आधी त्यावर चर्चा करावयास हवी होती. पण परस्परांवरील विश्वासाला तडा गेला आहे. केवळ "तू तू मैं मैं" करीत एकमेकांवर

कुरघोडी कशी करता येईल, इतपत विरोधी पक्षांनी संकुचितपणा बाळगलेला आहे. सकारात्मक प्रतिक्रिया त्यांनी कुठेच दाखविलेली नाही. केवळ बघ्याची भूमिका त्यांनी घेतलेली दिसते.

संघर्षाची अशी टोकाची भूमिका भारतीय संविधानाच्या विरोधी आहे. भारतीय संविधानाचे वास्तविक सूत्र सहकारी संघराज्याचे आहे. हे सहकार्य परस्परांवरील विश्वास, भरवसा, आदर, सलोखा, आस्था आणि परस्परांना समजून घेण्याची वृत्ती यांशिवाय शक्य नाही. अशी वृत्ती सर्वांनीच जोपासायला हवी.[१] "तू तरी कसा नांदतोस हे मी पाहतो", असे शड्डू ठोकून उभे राहिल्यास साऱ्या देशाचे नुकसान होणार आहे, याचे भान सर्वांनी बाळगायला हवे.

(या लेखाशी संबंधित तक्ते पुढे दिले आहेत.)

## काही वेचक सांख्यिकी

तक्ता क्र. १ : केंद्र सरकारची आवक-जावक (अब्ज रुपयात)

| महसुली खाते | २००७-०८ | २००८-०९ | २००९-१० | २०१०-११ | २०११-१२ अपेक्षित |
|---|---|---|---|---|---|
| महसुली आवक (जमा) | | | | | |
| अ) कर-उत्पन्न (राज्यांचा वाटा वगळून) | ४३९५ | ४४३३ | ४५६५ | ५७२८ | ६६४४ |
| ब) करेतर उत्पन्न | १०२३ | ९६९ | ११५३ | २२१५ | १२५४ |
| एकूण जमा | ५४१८ | ५४०२ | ५७२८ | ७९४३ | ७८९८ |
| महसुली जावक (खर्च) | | | | | |
| क) व्याज | १७१० | १९२२ | २१३१ | २३४७ | २६८० |
| ड) अर्थसाहाय्य | ६७५ | १२३५ | १३५५ | १३१२ | १३४४ |
| इ) संरक्षण | ५४२ | ७३३ | ९०७ | ९२४ | ९५२ |
| ई) अन्य (व्यवस्थापन इ.) | ३०१७ | ४०४८ | ४७२५ | ५८०८ | ५९९५ |
| एकूण खर्च | ५९४४ | ७९३८ | ९११८ | १०३९१ | १०९७१ |
| I महसुली तूट | (-)५२६ | (-)१२५३६ | (-)३३९० | (-)२४४८ | (-)३०७३ |
| II अ) भांडवल खाते | | | | | |
| (i) कर्ज वसुली | ५१ | ६१ | ८६ | १२७ | १५० |
| (ii) गुंतवणूक ऱ्हास | ३८७ | ६ | २४६ | २२८ | ४०० |
| (iii) कर्ज उभारणी | १२६९ | ३३७० | ४१८४ | ३६९० | ४१२८ |
| एकूण जमा | १७०८ | ३४३७ | ४५१६ | ४०४६ | ४६७८ |
| आ) भांडवली खर्च | ११८२ | ९०१ | ११२६ | १५९८ | १६०५ |
| II भांडवल खाते एकूण शिल्लक | ५२६ | २५३६ | ३३९० | २४४८ | ३०७३ |
| राजकोषीय तूट * | १२६९ | ३३७० | ४१८४ | ३६९० | ४१२८ |

* राजकोषीय तूट = एकूण विनियोग (५९४४ + ११८२ = ७१२६) वजा (कर्जवसुली ५१ + गुंतवणूक ऱ्हास ३८८ = ४३९ व महसुली जमा ५४१८ = ५८५७) = १२६९ यामाणे इतर वर्षासाठी.

तक्ता क्र. २
विदेशी येणी-देणी
(अब्ज डॉलरमध्ये)

| | २००७-०८ | २००८-०९ | २००९-१० | २०१०-११ प्राथमिक अंदाज |
|---|---|---|---|---|
| **अ) चालू खाते** | २५७ | ३०८ | ३०० | ३८१ |
| आयात | १६६ | १८९ | १८२ | २५० |
| निर्यात | (-)९१ | (-)११९ | (-)११८ | (-)१३१ |
| व्यापार शेष देणे | (+)७५ | (+)९१ | (+) ८० | (+) ८५ |
| अदृश्य बाबी हस्तांतरणे | (-)१६ | (-)२८ | (-)३८ | (-)४६ |
| चालू खात्यावरील तूट | | | | |
| **आ) भांडवल खाते** | २ | २ | ३ | ५ |
| विदेशी मदत | २३ | ८ | २ | १२ |
| व्यापारी कर्जे | १६ | -२ | ८ | १० |
| अल्पमुदती कर्जे | १२ | -३ | २ | ५ |
| बँक भांडवल | | | | |
| विदेशी गुंतवणूक | १६ | २२ | १८ | ९ |
| प्रत्यक्ष गुंतवणूक | २७ | -१४ | ३२ | ३० |
| शेअर बाजारात | ११ | -६ | -१३ | -६ |
| अन्य प्रवाहातून | १ | १ | | -३ |
| चूक भूल | १०८ | ८ | ५२ | ६२ |
| आ) भांडवल खाते जमा | ९२ | (-)२० | (-)१४ | (-)१६ |
| एकूण बाकी | ९२ | -२० | -१४ | -१६ |
| विदेश चलनसाठ्यात (-)वाढ/(+) घट (रिझर्व बँकेकडे) | | | | |

(स्त्रोत :- इकॉनॉमिक सर्व्हे २०१०-२०११, २०११-२०१२.)

पान नं. ११ वरील तळटीप ९: पंतप्रधानांना 'तुम्ही दुबळे आहात' असे घोकत राहिल्याने, 'तुम्ही शिखंडी आहात' अशी शिवीगाळ करण्याने सारे पक्षीय राजकारण गढूळ बनले असून देशात अस्थिरता वाढविण्यास साहाय्य झाले आहे. या अस्थिरतेमुळे गुंतवणूक करण्यास उद्योग कचरत आहेत. अर्थकारणास पूरक असे राजकारण केले गेले पाहिजे. नाहीतर मंदी आणि बेकारीच्या भोवऱ्यात आपण केव्हा सापडू, हे कळावयाचे नाही.

तक्ता क्र.३

केंद्र सरकारच्या राजकोषीय तुटीचे स्थूल राष्ट्रांतर्गत उत्पादिताशी प्रमाण (टक्के)

| साल | राजकोषीय तूट | महसुली तूट | प्राथमिक तूट* |
|---|---|---|---|
| २००७-०८ | २.५ | १.१ | (-)०.९ |
| २००८-०९ | ६.० | ४.५ | २.६ |
| २००९-१० | ६.५ | ५.२ | ३.२ |
| २०१०-११ | ४.८ | ३.२ | १.८ |
| २०११-१२ अपेक्षित | ४.६ | ३.४ | १.६ |

* राजकोषीय तूट वजा व्याजाचा खर्च.

सावध योग्य अशी तूट २-३ टक्क्यांच्या दरम्यान असावयास हवी.

तक्ता क्र.४

केंद्र व राज्ये मिळून राजकोषीय तुटीचे स्थूल राष्ट्रांतर्गत उत्पादिताशी प्रमाण (टक्के)

| साल | राजकोषीय स्थूल तूट | महसुली तूट |
|---|---|---|
| २००७-०८ | ४.१ | ०.२ |
| २००८-०९ | ६.४ | ४.३ |
| २००९-१० | ९.४ | ५.७ |
| २०१०-११ | ७.९ | ३.८ |
| २०११-१२ (अपेक्षित) | ६.९ | ३.३ |

(स्रोत : इकॉनॉमिक सर्व्हे २०१०-२०११, २०११ २०१२.)

तक्ता क्र.५

केंद्र सरकारने दिलेल्या अर्थसाहाय्याचा तपशील

अ) महत्त्वाचे अर्थसाहाय्याचा (कोटी रुपयात)

| बाबी | २००७-०८ | २००८-०९ | २००९-१० | २०१०-११ | २०११-२०१२ |
|---|---|---|---|---|---|
| अन्न | ३१३२८ | ४३७५१ | ५८४४३ | ६३८४४ | ७२८२३ |
| खते | ३२४९० | ७६६०३ | ६१२६४ | ६२३०१ | ६७१९९ |
| व्याज | २३११ | ३४९३ | २६८७ | ४६८० | ५७११ |
| डाळी | - | - | ३६६ | ९६३ | ६१६ |
| अन्य | १९७७ | ३००९ | ४००६ | ४२२४ | २००३ |
| पेट्रोलपदार्थ | २८२० | २८५२ | १४९५१ | ३८३७१ | ६८४८१ |
| एकूण** | ७०२९६ | १२९७०८ | १४१७१७ | १७४३८३ | २१६११३ |

** अंदाजपत्रकातून नोंदलेले महत्त्वाच्या बाबीसाठीचे अर्थसाहाय्य व इथे सविस्तरपणे दाखविलेले अर्थसाहाय्य यांत फरक आहे. या तक्त्यात बिगर महत्त्वाचे व पेट्रोल पदार्थासाठीचे अर्थसाहाय्य मिळवलेले असल्याने हा फरक पडला असावा. अंदाजपत्रकातील अर्थसाहाय्याचे विवरण न मिळाल्याने या दोन्हींत मेळ घालता आलेला नाही.

☆☆☆








# 'नल-दमयंती स्वयंवर'

प्रा. डॉ. वैशाली भालसिंग

**दमयंतीस्वयंवर : काळ अंदाजे (१६८३–८५)**

**प्रास्ताविक :**

विस्ताराकडे झुकलेल्या प्राचीन मराठी कवितेत रघुनाथपंडिताच्या काव्याइतके लहान पण कीर्तिमंत काव्य क्वचितच असेल. रघुनाथपंडिताविषयी निर्विवाद माहिती फारच थोडी आहे. काव्यांतर्गत पुराव्यावरून तो शिवकालीन असून तंजावरच्या राजकारणात मुरलेला दिसतो. समर्थ रामदासांचा भक्त असणारा हा पंडित संस्कृत आणि फार्सीचा चांगला जाणकार असावा. 'रामदासवर्णन' व 'गजेंद्रमोक्ष' या छोटेखानी काव्यांपेक्षा 'दमयंतीस्वयंवरा' मुळेच त्याची कविकीर्ती अढळ झाली आहे.

**२. तत्कालीन श्रोता :**

प्रत्येक साहित्याचा अभिप्रेत असा वाचकवर्ग असतो. त्याच्या रुची-अभिरुचीचा वाङ्मयावर परिणाम होत असतो. त्याचप्रमाणे वाङ्मयाचाही वाचकवर्गावर परिणाम होत असतो. मुळात पंडिती कवितेचा स्पष्ट वाचकवर्ग दाखविता येतो. तो सुखवस्तू आणि रसिक असा नागरिक आहे. काव्याचे मर्म जाणणारा सुहृदय आहे. नावीन्याची ओढ असणारा जिज्ञासू आहे. ऐहिक जीवनाविषयीची लोकांची ओढ या काळात वाढत गेली; म्हणून लोक-व्यवहारातील आवडीनिवडींचे चित्र वाङ्मयावर पडलेले दिसते.

'निंदा स्तुती जनांची । वार्ता वधुधनांची।।'-मोरोपंत हा सार्वकालीन भाग आहे.

'लोक निवती कथा विनोदे' असे नाथांनीही म्हटले आहे.

अशा श्रोत्यांना व कवींना स्फुरण यावे, असेच वातावरण त्या वेळच्या राजदरबारात होते. हा दरबार आहे, तंजावरनगरीत वास्तव्य करणाऱ्या भोसलेवंश-प्रदीप शहाजीराजांचा. येथील वातावरण विलासी, उच्च आणि सुसंस्कृत होते. स्वतः शहाजीराजे विविध विद्या-कलांचे उदार आश्रयदाते होते.

अशा श्रोत्यांसाठी कवींचा नवा वर्ग उदयाला आलेला दिसतो.

निव्वळ लौकिक भूमिकांतून लिहिलेले, तंजावर-कडील साहित्य मराठी साहित्यपरंपरेत आपल्या वेगळे-पणाने उठून दिसते. रघुनाथपंडिताचे 'दमयंतीस्वयंवर' हे याचेच उदाहरण आहे.

**२. दमयंतीस्वयंवराख्यान - नैषधटीका :**

'व्यासोक्ते अवगाहिला' असे म्हणून रघुनाथपंडिताने महर्षी व्यासविरचित महाभारतातील आरण्यक पर्वातील कथेचा उल्लेख केला आहे. महाभारताच्या वनपर्वातील नल-दमयंतीची कथा महाकाव्यांतर्गत महाकाव्याचा नमुना आहे.

'बहुगुणी नानागुणी गायिला' असा पुढच्याच ओळीत श्रीहर्षाच्या नैषधीयचरिताचा उल्लेख रघुनाथपंडिताने केला आहे. श्रीहर्षाच्या नैषधीयचरितामधून नल-दमयंतीकथा विदग्ध महाकाव्याच्या डौलात सांगितली जाते. त्यातील प्रसंग, कल्पना, अलंकार व शब्दयोजना यांना वाट पुसत रघुनाथाने ती श्लोकबद्ध रूपात ग्रथित केली आहे. नैषधीयचरिताच्या २२ सर्गांपैकी पहिल्या १४ सर्गांतील १७५० श्लोकांचा आशय अवघ्या २५४ श्लोकांत आणावयाची किमया रघुनाथाने केली आहे. पहिल्याचा विस्तार आणि दुसऱ्याचा आटोपशीरपणा यांतील विशेष डोळ्यांत भरण्यासारखा आहे. मुळचा सरस व सुबक संक्षेप साधून रघुनाथाने स्वयंप्रज्ञेची जोड त्यास दिली आहे. संपूर्ण कथेला मराठी रंग देण्यात त्याने आपले कौशल्य प्रकट केले आहे.

'कथा बोलू हे मधुर सुधाधारा। होय शृंगार करुण रसांधारां' ।।३।।

असा रसविचार रघुनाथपंडिताने सांगितला आहे. मधुर, सुधा, शृंगार आणि करुण रसाचा उठाव साधणारी ही समग्र कथा सांगावयाचा त्याचा संकल्प होता; पण










प्रत्यक्षात नल-दमयंतीच्या विवाहापर्यंतचा पूर्वार्धच सांगितला गेला. त्यामुळे शृंगारालाच महत्त्व मिळाले आणि कथेला स्वयंवरकथेचे रूप आले.

'इंद्रादिक वर असतां।
कशी नलसतीच होय दमयंती'।।२।।

स्वयंवरकथा हा मराठी कथात्मक कवितेला आवडणारा विषय आहे. पंचमहाकाव्यांचा आदर्श गिरवणारी ही रचना मोठ्या प्रमाणावर स्वयंवराच्या आख्यानवस्तूभोवती रुंजी घालताना दिसते. सीता, रुक्मिणी आणि द्रौपदी यांची स्वयंवरे मराठी कवींनी चवीने रंगविली आहेत; पण दमयंतीस्वयंवर हे असे एकटेच आहे, की त्यात नल-दमयंतीस्वयंवर ही मानवी प्रेमकथा निवडण्यात कवीची लौकिक स्वरूपाची काव्यदृष्टी प्रकट झाली आहे. त्यामुळे आध्यात्मिक प्रेरणा आणि भक्तिमुक्तीचे प्रयोजन यांपासून दमयंतीस्वयंवर मुक्त राहिले आहे. मराठी भक्तिप्रधान वाङ्मयात ते उठून दिसते.

### ३. दमयंतीस्वयंवराचे कथानक :

दमयंतीस्वयंवर ही निषध देशाचा राजा नल आणि वैदर्भी राजकन्या दमयंती यांची नाट्यात्म प्रेमकहाणी आहे. नलाची कीर्ती ऐकून दमयंतीने त्याला मनोमन वरले आहे. नलही तिच्यावर अनुरक्त आहे. एकमेकांना न पाहताच केवळ गुणश्रवणाने हे प्रेमिक परस्परांवर लुब्ध झाले आहेत. विप्रलंभ शृंगार आपल्या नजाकतीने तेथे अवतरला आहे. एका हंसाने दौत्य करून या प्रेमाला आणखी लज्जत आणलेली आहे. प्रत्यक्ष स्वयंवरप्रसंगी मात्र नलाबरोबरच इंद्र, वरुण, यम आणि अग्नी हे देवही नलरूपात उपस्थित असतात. दमयंतीचा दृढ निश्चय कळल्यावर देव नलाच्या सौजन्याचा फायदा घेऊन, त्यालाच आपली वकिली करण्यासाठी दमयंतीकडे पाठवितात. नल-दमयंतीची पहिली भेट होते ती अशी. नलाची कर्तव्यनिष्ठा आणि दमयंतीची प्रेमनिष्ठा पणाला लागते. स्वयंवरात इंद्रादी चारही देव नलाचेच रूप घेऊन त्याच्या शेजारी बसतात. पण आपल्या प्रेमाने आणि वाक्‌चार्तुयाने दमयंती नलाच्या गळयात माळ घालते. या विवाहमंगला-बरोबरच 'दमयंतीस्वयंवर' विराम पावते. पुढील करुणगंभीर कथेला स्पर्श करत नाही. प्रवाही निवेदना-बरोबर रघुनाथांची कथा वाहत जाते आणि आटोपशीरपणा व स्वाभाविक असा घाट धारण करते.

### ४. दमयंतीस्वयंवराचे वाङ्मयीन सौंदर्य :

#### ४.१ रेखीव व्यक्तिचित्रण

दमयंतीस्वयंवरामधील व्यक्तिचित्रण व कथानक अन्योन्याश्रयी आहे. कृती, भक्ती, अभिप्राय, सरळ निवेदन अशा अनेक प्रकारांनी व्यक्तिचित्रणे साकारली आहेत. भीमक, दमयंतीची आई, नारद, इंद्र, अग्नी, वरुण, यम या गौण पात्रांची चित्रणे यात नाहीत. नल-दमयंती या प्रधान पात्रांची चित्रणे वास्तववदर्शी नसून पारंपरिक आदर्शवादी आहेत. एकूण स्थिरप्रकृती पात्रे असून ती विकसनशील नाहीत. जनमानसातील स्थिर व्यक्तिरेखा रंगवण्याचे कठीण काम रघुनाथाने यशस्वीपणे केले आहे. येथील पात्रे मानवी आहेत. लौकिक पातळीवर वावरणारी आहेत. नल-दमयंतीसारख्या धीरललित नायक-नायिकेचे चित्रण रघुनाथपंडिताने अभिजात पद्धतीने केले आहे. पण दौत्य करणाऱ्या हंसाच्या व्यक्तिरेखेत जे मानवी भावसौंदर्य हलक्या हाताने भरले आहे, ते केवळ अजोड आहे.

**नल :**

वीरसेनेचा पुत्र व निषध देशाचा राजा नल हा प्रेमी तरुण नायक असला तरी धीरोदात्त आहे. चंद्राच्या चौपट शांत असला, तरी त्याचा प्रतापसूर्य कधीही न मावळणारा आहे. पुण्यश्लोक नृपावलींतील पहिला मानकरी असून, 'नल लोकी नसे नल मन स्थूलना विलोकी' अशी त्याची ख्याती आहे. नलाने चौसष्ट कला आत्मसात केलेल्या असून तो अश्वविद्या व धनुर्विद्या यांत पारंगत आहे. दीनबंधू, नीतिमान व दयासिंधू असा नल सदाचारी आहे. प्रत्यक्ष कामदेव मदन व अश्विनीकुमार यांनी माना खाली घालाव्यात, असे अप्रतिम शारीरिक सौंदर्य त्यास लाभलेले आहे. त्याचे दातृत्व तर इतके विलक्षण की त्याचे याचक म्हणून द्रव्य घेऊन जाणारे लोक इतके श्रीमंत होतात की, ते इतर याचकांना धन वाटू शकतात.

'........तो नल महि आहे गोपयिता शोभतो'।।१६।।
जो धैर्य धरसां, सहस्रकरसां तेजे तमा दुरसा।।
जो रत्नाकरसा गंभीर शिरसाभूपां ।।
ज्ञाता जो सरसावला नवरसां माक्ष शृंगारसा।।

अनुक्रमणिका

शोभे तामरक्षास तो नल.........।।१७।।

असे त्याचे रूप-गुणवर्णन रघुनाथाने केले आहे.

दमयंतीसारख्या तरुण सुंदरीचे वर्णन ऐकून तारुण्य-सुलभ अशा विकारांनी तो अस्वस्थ झाला. कारण 'जाया ते रुचलि' परंतु 'ती दृष्टीस पडेना' व तीजकडे 'जाया न ये', अशी स्थिती असल्याने 'मन कोठेही रमेना' म्हणून तो वनविहारास निघाला. सुवर्णमय कांती असलेल्या हंसाला सरोवराकाठी पाहून तो थबकतो आणि त्याला पकडतो. हंसाने कितीही विनवणी केली व करुणा भाकली, तरी नल त्याला आधी सोडत नाही. मात्र

मजं ही वध कराया पातकी पातला जो।
वरुनी पति असा ही भूमि कैसि न लाजो।।५३।।

असे हंसाचे उद्गार ऐकून राजा लज्जित होतो आणि हंसाला सोडून देतो. नलाची विरहावस्था चाणाक्ष हंस जाणतो.

'चतुर ए तरुण हृदयंगमा करवीतो
तिजसी तुज संगमा' ।।६३।।

असे आश्वासन देतो. हंसापुढे कोणताही आडपडदा न ठेवता नलराजा आपले मनोगत त्याला सांगतो. पण त्याचबरोबर दमयंतीला यासंबंधी काही न बोलण्याची सूचना तो हंसाला करतो. येथे नलाचा मोकळेपणा व समयसूचकता विशेष लक्षात घेण्यासारखी आहे.

दमयंतीच्या पाणिग्रहणासाठी नल मोठ्या उत्साहाने निघाला असता वाटेत त्याची इंद्र, वरुण, अग्नी व यम या देवांशी गाठ पडते. इंद्र नलाच्या औदार्याचा फायदा घेऊन स्वतःला वरण्याची दमयंतीला विनवणी करण्यासाठी नलालाच दूत म्हणून जाण्याची गळ घालतो. तेव्हा नलाच्या मनात अनेक विकल्प येतात.

मज निज सु-मनाची घातली माळ तीने।।
हृदय तरी तियेच्या सांद्र झाले सुपासे ।।
चलित न करावे ते कोणत्याही प्रयासे ।।१७८।।

इतके स्वच्छ व स्पष्ट सांगूनही इंद्र आपला हट्ट सोडत नाही. तेव्हा नाइलाजाने नलराजा इंद्राचे दौत्य स्वीकारतो. दमयंतीवर लुब्ध झालेला असताना व तीही आपल्यावर अनुरक्त आहे हे माहीत असूनही तो दमयंतीस,

'टाकूनि इंद्राचा संभ्रम। धरिसी कां हा नलभ्रम'।।२२७।।

असे म्हणतो.

'नलमाया टाकूनी देवराया वरी'।।२२८।।

असे परत सांगतो. यामध्ये त्याची कर्तव्यनिष्ठा व धैर्य दिसून येते. पण दूतकार्यात त्याला यश येत नाही.

स्वयंवरमंडपात गेल्यावर मात्र शारदा दमयंतीस खऱ्या नलाची ओळख करून देताच ती त्याला माळ घालते.

समाजमानसातील आदर्श राजाची प्रतिमा येथे नलाच्या रूपाने साकारली आहे.

**४.१.२ दमयंती :**

भीमक राजाची मुलगी दमयंती वैदर्भी राजकन्या आहे. धैर्यधुरंधर नलाला साजेशी अशी अनुपम सौंदर्यवती आहे. तिच्या विनयशीलतेने सौंदर्याला उठाव आला आहे. सख्यांबरोबर उपवनात खेळणारी दमयंती अल्लड आहे. तसेच नलाच्या रूपगुणवर्णनाने हरखून जाण्याइतके प्रौढत्वही तिच्या ठायी आहे.

दमयंती गोरोचनाप्रमाणे गौरवर्णी, बावनकशी सोन्यासारखी तेजस्वी, सरसिरुहाच्या अंतरंगाप्रमाणे कांतिमान आहे. तिचे मुख पूर्णचंद्रासारखे गोल आहे. नाक चाफेकळीसारखे सरळ आहे, तर ओठ पोवळ्या-प्रमाणे रक्तवर्णी आहेत. कृशकटी आणि कृश अधरा अशी दमयंती मृगाक्षी आहे. तिच्या चालीतही हंसाचा डौल आहे. परिपूर्ण स्त्रीसौंदर्याची जणू ती पुतळी आहे.

याबरोबरच दमयंती वाक्चतुर, कुशल, मर्यादाशील आणि दृढनिश्चयी अशी सर्वगुणसंपन्न आहे.

नलाचा निरोप घेऊन हंस कुंडिलापुरात आला असता, त्याच्या सुवर्णमय देहाचे व मानवी वाणीचे दमयंतीस नवल वाटते. नलाचा निरोप सांगण्यासाठी आलो आहे, असे हंसाने सांगताच ती आनंदित होते. नलासंबंधी ऐकण्यासाठी आपण भुकेले आहोत, असे हंसाने सांगताच ती आनंदित होते. नलाने पत्नी म्हणून तुझी निवड केली आहे, असे हंसाने सुचवताच दमयंती आनंदविभोर होते.

नलाच्या विरहाने व्याकूळ झालेल्या दमयंतीचे कशातच लक्ष लागत नाही. कोणतीही गोष्ट तिला रुचत नाही. कुलवती असल्याने ती कुणालाही काही सांगू शकत नाही. 'झाकितसे विरहपाक परंतु तो न झाक'. तिचे शरीर विरहाने इतके व्याकूळ होते, की तिला मूर्च्छाच










येते. शीतलोपचारांनतर शुद्धीत आल्यावर 'औषध नलगे मजला' असे म्हणून ती आपल्या मनीचा भाव सूचकतेने व मर्यादाशील वृत्तीने आईजवळ व्यक्त करते.

नल जेव्हा इंद्राचा दूत म्हणून दमयंतीस भेटतो, तेव्हा त्याचे 'इंद्राला तू वर' हे सांगणे तिला रुचत नाही.

नलावेगळा भ्रतार नलगे स्वप्नींही साचार, असा आपला दृढनिश्चय ती बोलून दाखविते.

स्वयंवरमंडपात उपस्थित पाच नलांपैकी खऱ्या नलाला माळ घालते. तेव्हा इंद्रादी देव कोपू नयेत, म्हणून 'दमयंती सुंदरी इंद्रादिका नमस्कारी'. आपल्या चतुर वागण्याने व गोड शब्दांनी ती देवांनाच स्वतःचे कन्यादान नलाला करण्याची विनंती करते.

माझा भीम जैसा पिता। तैसे तुम्ही जी तत्त्वता।।
करा कन्यादान आतां। नलनायाचे करी।।२४८।।

एकूण दमयंती लावण्यकुलगुण पतिव्रता अशी आदर्श प्रेमिका आहे.

### ४.१.३ हंस

नलदमयंतीच्या नाट्यात्म प्रेमकथेत दौत्य करणाऱ्या राजहंसाच्या व्यक्तिरेखेत मानवी भावसौंदर्याचे रंग रघुनाथपंडिताने फार सुरेखपणे भरले आहेत.

वाक् आणि बुद्धिचातुर्य, हर्षखेदादी भावना, व्यवहारकुशलता व कृतज्ञताबुद्धी इ. अनेक मानवी वैशिष्ट्ये हंसाच्या ठिकाणी दिसून येतात. हंसाच्या स्वभावचित्रणाला थोडाच अवसर असला, तरी त्याचे व्यक्तिचित्र ठसठशीत उठले आहे.

मंदाकिनीमधील कनकारविंदे खाणाऱ्या हंसाचा देह त्यामुळे कांचनाचा आहे. त्याच्या पंखांत विजेची चमक आहे. चोच आणि पाय माणकासारख्या लाल रंगाचे आहेत. जलविहाराने क्लान्त होऊन हंस एक पाय पोटाशी घेऊन झोपला असता, नलराजा त्याला पकडतो.

'कल कल कल हंसे फार केला सुटाया'; पण त्याचा उपयोग होत नाही. स्वजनांची मदत मागावी तर इतर हंस घाबरून पळून गेले आहेत. तेव्हा

'कठीण समय येता कोण कामास येतो'।।४५।।

अशी हंसाला प्रतीती येते. राजहंस सुटण्यासाठी नलाची प्रथम स्तुती करतो, नंतर निर्भर्त्सना करतो. शेवटी व्याकूळ होऊन आपल्या संसाराची व्यथा नलाला सांगतो. दयासिंधू, दीनबंधू अशा नलाचे अंतःकरण द्रवते व तो हंसाला सोडून देतो. नलाच्या या सहृदयतेचा व जिव्हाळ्याचा परिणाम राजहंसावर होतो. तो नलाजवळ प्रायश्चित्त म्हणून आपल्याला नलाने काही काम सांगावे, असा आग्रह धरतो. राजहंस चाणाक्षपणे नलाची विरहावस्था जाणून असे आश्वासन राजास देतो. दमयंतीच्या लावण्याचे वर्णन करून हंस राजाचे मन जिंकतो. नलही आपल्या मनाची विरहावस्था हंसाजवळ व्यक्त करतो. नलाचे दौत्य स्वखुशीने पतकरून हंस कुंडिनापुरला दमयंतीकडे जातो.

कुंडिनापुरला राजहंस आला असता उपवनात आपल्या सख्यांसोबत क्रीडामग्न अशी दमयंती त्याला दिसते. आपल्या पंखांचा फडफड आवाज करून हंस दमयंतीचे लक्ष आपल्याकडे वेधतो. सोनेरी पंखाचा राजहंस पाहून दमयंती मोहित होते. हंस चतुराईने तिला तिच्या सख्यांपासून दूर नेतो. हंसाची मानवी वाणी ऐकून दमयंती विस्मयचकित होते. हंसाला पकडण्यासाठी झालेला क्षीणही विसरते आणि हंसाची चौकशी करते. तेव्हा हंस आपण नलराजाचे दूत म्हणून आल्याचे सांगतो. नलाचे नाव ऐकताच दमयंती उत्साहित होते.

'नले तुजसी काय एकांत केला। तोचि ऐकाया जीव हा भुकेला'।।

असे म्हणते. तेव्हा राजहंस तिला

'नल म्हणाला,
एक नोवरी मज योग्य बरी पाही'।।१२७।।

असे सांगतो आणि

'तू सांग तो वर तुला रुचला रसाळ'।।१२८।।

असे विचारतो. तेव्हा दमयंती आपली नलावरील प्रीती उघड करते. दमयंतीची विकलावस्था पाहून हंस

'अशी रंजली तू निषधभूपीं, तसा तोही रंजला तुझ्या रूपी'।

दैवघटित अन्योन्य काल सौपीं तुम्ही नांदाल सत्य मी निरोपी।।१३५।।

अशा सदिच्छा व्यक्त करतो. दमयंतीही नलावर लुब्ध आहे, असे समजल्यामुळे 'सफल माझे येथवरी येणे' अशा समाधानाने हंस नलाकडे परत जातो.








'नृपराज सु-गुण साका।
माळ घालीते ती तुला उदारा।।
तुझ्या ध्यानी सलग्न जे विचारा।
सत्य मानी ती होय तुझी दारा'।।

असे नलाचे समाधान करून हंस स्वगृही परततो. नल-दमयंतीच्या उत्कट प्रीतीची लज्जत हंसाने दूत बनून वाढविली आहे. त्याने प्रेमिकांना जणू जवळ आणले आहे. राजहंसाचे सजीव शब्दचित्र काढण्यास रघुनाथ-पंडिताची प्रतिभासंपन्नता, अभिजात रसिकता व विदग्धता प्रकट झाली आहे.

**४.२ सरस वर्णने**

दमयंतीस्वयंवर या आटोपशीर आख्यानातील वर्णने फार हृदयस्पर्शी आहेत.

**रूपवर्णने :**

नल-दमयंतीसारख्या प्रधान पात्रांची रूपवर्णने सुरेख उतरली आहेत. अभिजात संस्कृत वाङ्मयाची अत्यंत ठळक प्रवृत्ती म्हणजे आदर्शवाद. दमयंतीस्वयंवरातील नायक-नायिका धीरललित आणि सर्वगुणसंपन्न आहेत. मानवी सौंदर्याची जणू परिसीमा आहेत.

उदाहरणार्थ, दमयंती लावण्यगुणकुलपतिव्रता अशी सर्वांगसुंदर नायिका आहे. गौरोचना, परिस गौर मृगाक्षी कृशाधरा, कृशकटी, बावनकशी सोन्यासारखी तेजस्वी सरसिरुहाच्या अंतरंगासारखी कांतिमान,चंद्रासारख्या गोल चेहऱ्याची, चाफेकळी नाकाची व पोवळ्यासारख्या रक्त-वर्णी ओठांची, हंसासारख्या डौलदार चालीची आहे.

मुख्य पात्रांच्या रूपवर्णनात सांकेतिक प्रतिमानांचा सढळ वापर केला गेला आहे. त्यामुळे त्यांच्या व्यक्तिचित्रणाला विशिष्टता न येता साचेबंदपणा आला आहे.

गौण पात्रांची रूपवर्णने दमयंतीस्वयंवराख्यानात येत नाहीत.

**प्रसंगवर्णने :**

प्रसंगनिमिर्ती अशी करावयाची की, त्यातून भावाविष्कारही साधावा आणि व्यक्तिस्वभावाचे मर्मही प्रकट व्हावे, हे रघुनाथाच्या आविष्कारपद्धतीचे द्योतक आहे. नाट्यमय प्रसंगनिमिर्ती हे रघुनाथाच्या कवितेचे एक बलस्थान आहे. हंस-नल, हंस-दमयंती, दमयंती-देव यांच्या प्रथमभेटीचे प्रसंग दमयंतीस्वयंवरातील सौंदर्यस्थळे आहेत. या साऱ्या प्रसंगांत पुरेपूर नाट्य भरले आहे. व्यक्तींची भावक्षोभक मन:स्थिती, प्रसंगाचे बदलते संदर्भ किंवा नाट्यछटा यांतून बहुधा हे नाट्य निर्माण होते. रघुनाथाची नाट्यात्म प्रतिमा असे प्रसंग बरोबर हेरते आणि वेगवान निवेदन, खटकेबाज व चतुर संवादांतून ते फुलविते. संवादांच्या जिवंत प्रतीतिदर्शक वापरामुळे त्यातील भावनाट्य वेधक व आवाहक होते. प्रसंगवर्णनामध्ये काही वर्णने सूक्ष्म तपशीलवार आहेत. ती प्रत्यक्ष पाहिलेल्या प्रसंगावार आधारित आहेत. त्यात रघुनाथपंडिताच्या प्रतिभेचा चमकदारपणा दिसतो. नलाने हंसाला पकडणे किंवा दमयंतीने हंसाला धरण्याचा प्रयत्न करणे यांसारखे प्रसंग या दृष्टीने पाहण्यासारखे आहेत.

**स्थितिवर्णने :**

जलविहाराने क्लान्त होऊन झोपलेल्या हंसाचे वर्णन हुबेहूब वठले आहे. नलाच्या विरहाने व्याकूळ झालेल्या दमयंतीच्या स्थितीचे वर्णन किंवा दमयंतीवर लुब्ध झालेल्या नलाच्या भ्रांतीचे वर्णन फार रमणीय झाले आहे.

**नगरवर्णने :**

हंसाला होणारे कुंडिनपुरचे दर्शन अतिशयोक्त आहे. येथेही अभिजात संस्कृत वाङ्मयातील आदर्शवादाचा प्रभाव जाणवतो. वस्तू, ठिकाण इ. जसे आहे तसे वर्णन न करता जसे असावे वाटते, तसे त्याचे वर्णन करावयाचे. वर्ण्य विषयाची संपन्नता, विपुलता वर्णन केल्याने उदात्त अलंकार होतो. अशाच प्रकारे नल राजाच्या उपवनाचे वर्णनही मोहक आहे. येथेही परिपूर्णतेचा ध्यास आहे. त्यामुळे पनस, जम्बू, जंबीर, माकंद(आंबा), चंदन, कुंद, डाळिंब अशी सर्व प्रकारची झाडे काळ, वेळ प्रदेश न पाहता एकाच ठिकाणी उगवलेली आहेत. वनात मधून वाहणाऱ्या कालव्याच्या पाण्यात नेहमीच कमळे फुलल्याने त्यांचा मकरंद कालव्यातून भरून राहिला आहे. म्हणून उन्हाळ्यातही ते शीतल आणि सुखकर वाटतात, यासारख्या कल्पनारम्य शब्दचित्रांनी बहार आली आहे.

एकूणच वर्णने सरस, सुरस उतरली आहेत. त्यांतील तपशिलांचा बारकावा, सूक्ष्मता, सजीवता यांमुळे ती रुचिर झाली आहेत.









### ४.३ समर्पक अलंकारयोजना

कवीच्या कल्पनेची मनोहर क्रीडा म्हणजे अलंकार. संस्कृत महाकाव्याचा आदर्श समोर ठेवून स्वयंवराख्यान लिहिलेले असल्याने अलंकारांचे वैपुल्य दिसते. संस्कृत काव्यवाङ्मयाच्या परिशीलनाने व पांडित्य प्रकट करण्याची हौस असल्याने आपले काव्य पंडितांनी विविध अलंकारांनी नटविले आहे. स्वयंवराख्यानात अशा प्रकारच्या अलंकाराच्या प्रदर्शनाला वाव मिळू शकतो. रघुनाथपंडिताच्या काळात सालंकृत कन्यादानाइतकेच आलंकारिक काव्याचे महत्त्व होते. अलंकार मोजकेच व सौष्ठवपूर्ण असतील तर काव्याचे अंतरंग फुलून दिसते, यात शंका नाही. रघुनाथपंडिताला अलंकारांची हौस असली, तरी त्याने त्यापायी कथेला किंवा स्वभावचित्रणाला कमीपणा येऊ दिलेला नाही. संस्कृतप्रचुर समासामुळे क्वचित क्लिष्टता आली आहे; पण एरवी हानी मात्र झालेली नाही. उलट, दमयंतीस्वयंवराख्यान हे त्यातील विविध अलंकारांमुळे लोकप्रिय झालेले आहे. अलंकार सफाईने वापरण्याची रघुनाथाची हातोटी खास आहे.

यमक, अनुप्रास, उपमा, रूपक हे पंडितांचे आवडते अलंकार आहेत. त्यांचा सढळ वापर झालेला दिसतो. अतिशयोक्ती, आपन्हुति, अर्थान्तरन्यास, उत्प्रेक्षा, दृष्टान्त, परिकर, पर्यायोक्त, प्रतिवस्तुप्रभा, भ्रांतिमान, श्लेश, व्यतिरेक, व्याजस्तुति, स्वभावोक्ति यांसारख्या परिचित अलंकारांचा वापर केला आहे. यांखेरीज अत्युक्ति, आशी, उदात्त, कारणमाला, आक्षेप, काव्यलिंग, काव्यार्थापत्ती, प्रताप, प्रहर्षण, प्रेयस, यथासंख्य, सदाचार, रसवत्, लोकोक्तिसम, समासोक्ती इ. नेहमी वापरात नसणाऱ्या संस्कृत अलंकारांची उदाहरणेही काव्यात सापडतात.

दमयंतीस्वयंवराख्यानात अलंकारवैपुल्य व वैचित्र्य आहे. उपमाने क्वचित सांकेतिक असली, तरी तेथे नावीन्य व सौंदर्यपूर्णताही आहे. अलंकारांच्या निर्दोष रचनेवरुन रघुनाथपंडिताच्या अलंकारशास्त्राच्या सूक्ष्म अभ्यासाची साक्ष पटते.

दमयंतीस्वयंवरामधील श्लेषाची दोन उदाहरणे पाहू.

नलराजकथा सुधाचि साजे दमयंती वरवर्णिनी विराजे।
मिळणी उभया होय जेथे अधिकारी अधिकानुराग तेथे।।२०।।

या ओळीत सुधा म्हणजे अमृत व चुना, वरवर्णिनी म्हणजे श्रेष्ठ वर्णाची स्त्री व हळद; तर अनुराग म्हणजे प्रीती व तांबडेपणा असा दुहेरी अर्थ आहे. नलाची आधीच अमृतासारखी मधुर कथा आणि ती ऐकणारी दमयंतीसारखी सौंदर्यवती असा योग जुळून आल्यावर त्यांच्यात प्रेम जमावे, हे ठरल्यासारखेच होते. चुना आणि हळद यांचा मिलाफ झाल्यावर तेथे तांबडेपणा निर्माण होतो, तसेच हे आहे.

यासारखे आणखी एक प्रसिद्ध उदाहरण म्हणजे–

औषध नलगे मजला परिसुनि
जननी बरे म्हणूनी डोले ।।१५।।

नलाच्या विरहाने व्याकूळ झालेली दमयंती मला औषध नको असे म्हणते तर खरे; पण नल हेच माझे औषध आहे, असे आपल्या आईला सूचित करते. हा गूढ अभिप्राय मुलीच्या आईला कळणार नाही, तर कोणाला कळेल?

### ४.४ रसानुकूल वृत्तयोजना :

पदसंख्येच्या दृष्टीने हे स्वयंवराख्यान लहानसे असले तरीसुद्धा त्यातील वृत्तांची विविधता चटकन नजरेत भरण्यासारखी आहे. वृत्तवैचित्र्य हे रसानुकूल असते, तसेच ते कवीचे पांडित्य व कलाकुसरीचे निदर्शकही असते.

रसाच्या निरनिराळ्या छटा व्यक्त करण्यासाठी एकच एक वृत्त उपयुक्त ठरू शकत नाही. धावत्या निवेदनासही वृत्तवैचित्र्य उपयुक्त म्हणून रघुनाथपंडिताने विविध वृत्तांचा वापर केला आहे.

पुढे वृत्तांची नावे दिली आहेत, तर कंसातील आकडे एकूण वृत्तसंख्या दर्शवितात.

प्रमाणिका (१), उपेंद्रवज्रा (१), स्वागता (३), द्रुतविलंबित (६), भुजंगप्रयात (१), वंशल्य (१) , स्राविणी (१), वसंततिलका (७८), मालिनी (२४), शिखरिणी (९), शार्दूल विक्रीडित (१), सवाई (१), यांसारखी समवृत्ते; अनुष्टुप (१), माल्यभारा (१) ही अर्धसमवृत्ते यांसारखी वृत्ते आढळतात. ही दोन्ही प्रकारची अक्षरगणवृत्ते संस्कृत लक्षणाप्रमाणे आहेत. याशिवाय गीति (७), चूर्णिका (१), पदे (१५), ओवी (४८),

दंडी(दिंडी)(६६) अशा स्वतंत्र वृत्तांतही बरीचशी रचना आहे. दंडी/दिंडी या वृत्तांच्या लोकप्रियतेचे बरेचसे श्रेय रघुनाथपंडिताकडे जाते. त्याने या वृत्ताचा बराच उपयोग केला आहे.

**४.५ भाषाषैली :**

**निवेदनशैली :**

दमयंतीस्वयंवराख्यानातील निवेदन प्रवाही आहे. या वेगवान निवेदनाबरोबर रघुनाथाची कथा वाहत जाते आणि आटोपशीरपणा व स्वाभाविक घाट धारण करते.

**शब्दकळा**

व्याकरणशुद्ध, बांधीव, घोटीव, रेखीव, संस्कृतप्रचुर, प्रौढ, वृत्तबद्ध मराठीचे दर्शन या आख्यानातून घडते.

लांब लांब समास, अपरिचित शब्द, संस्कृत काव्यामधील कविसंकेत व संस्कृतधर्तीची मराठी शब्दांची रूपे करण्याची हातोटी लक्षात घेता रघुनाथपंडिताच्या काव्य व साहित्यग्रंथांच्या व्यासंगाची खात्री पटते.

आख्यानाची शब्दकळा निरनिराळ्या भाषास्तरांनी युक्त आहे. संस्कृत तत्सम शब्द उदा., वन, तटाक, लता, मौक्तिक, द्विज, भृंग, खगेंद्र, गजराजगामी इ.

संस्कृत तद्‌भव शब्द तदीय, समीपात, गणिला, अनळ, वीरसेना, दळ, भूमिपाळ इ. यांची आख्यानात रेलचेल आहे. काही अस्सल मराठी जुने शब्द व त्यांची कर्मणी मराठी रूपे या काव्यात आली असून ती रघुनाथाच्या मराठी संतकवींच्या ग्रंथांच्या अभ्यासाची निदर्शक आहेत.

मराठी वाचकांच्या नित्य वापरात नसलेले शब्द पाहून दुर्बोधतेचा आरोप केला जातो. पण असे शब्द थोडे आहेत. अलंकारांचा हव्यास हे दुर्बोधतेचे आणखी एक कारण आहे. मुळात ज्या नैषधीयचरितावरून या आख्यानाची कल्पना रघुनाथपंडिताला सुचली, ते क्लिष्ट म्हणून प्रसिद्धच आहे. तेव्हा नकळत गुणांबरोबर दोषांचाही परिणाम होणे स्वाभाविक आहे.

कवीच्या कालाचा व तत्कालीन शब्दप्रयोगांचा परिणाम त्याच्या भाषेवर होणे अपरिहार्य असते. शिवरायांचा तत्कालीन वेष पाहून नलालाही विजार-डौर असा पेहराव देण्याचा मोह रघुनाथाला आवरता आलेला नाही. बाजी, राजी, हेजीब, बंका, शिपाई, फौज यांसारख्या अरबी-फार्सी शब्दांचा किती भरणा होता, याची कल्पना येते.

समासप्रचुरता हे रघुनाथाच्या शब्दकळेचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. शहराचे, नलाच्या वनाचे किंवा व्यक्तींचे वर्णन करताना लांब लांब समास वापरले असले, तरी भावपूर्ण प्रसंगांचे चित्रण करताना रघुनाथ-पंडितांची भाषा सोपी, निरलंकृत व सुटसुटीत होते. काही वेळा समास गंगाजमनी आहेत, असा पंडितांवर आरोप होतो; पण तो भ्रामक आहे. काही ठिकाणी अशुद्ध प्रत समोर असल्याने समास मानण्याची चूक झाली आहे. उदा., नेजी तुरगीचे हा शब्द एक नसून ने जी तुरगीचे असे भिन्न शब्द आहेत.

क्वचित दंडी अगर दिंडी किंवा पदामध्ये ऱ्हस्व-दीर्घांची ओढाताण झाली आहे. पण ही दोन्ही वृत्ते, जातिवृत्ते असून संस्कृत अक्षरगणवृत्तांच्या मानाने शिथिल आहेत.

**अश्लीलता :**

दमयंतीस्वयंवरातील मुख्य रस शृंगार असून तो विप्रलंभ आहे. हंसाने केलेले दमयंतीचे वर्णन (६८,६९,७१) किंवा चोळीस आणिक निरीस हरी निरीक्षी (११७) अशासारख्या स्थळांकडे निर्देश करून अश्लील-तेचा आरोप करणे शक्य आहे. उलट, याहूनही अधिक उत्तान शृंगारिक वर्णने संस्कृत काव्यांतून पुष्कळ ठिकाणी आढळतात. कवी ज्या काळात वावरला, त्या वेळी अशी वर्णने निषिद्ध मानली जात नसत.

एकूण तत्कालीन मराठीचे प्रातिधिनिक रूप येथे दिसते. काव्यानुकूलता हीच कसोटी शब्दकळेसाठी वापर-लेली आहे.

**१. सुभाषितप्रवणता :**

सुभाषित हा संस्कृत शैलीचा सुंदर विशेष आहे. जीवनसत्य सारगर्भ शब्दांत ठसठशीतपणे सांगण्याने वाणीला सुभाषितरूपता येते. त्यामागे कवीचे जीवनचिंतन, लोकव्यवहाराचे अवलोकन आणि जीवनाची काहीएक समज असते.

'कठीण समय येतां कोण कामास येतो'।।४५।।

'जे कार्य ते धरिल की गुण कारणाचे' ।।११८।।

ही अर्थान्तरन्यासाची दोन उदाहरणे या दृष्टीने पाहण्या-सारखी आहेत.










**संस्कृत वाग्विशेष :**

संस्कृत भाषेची विशिष्ट मोडणी, तिचे वाग्विशेष पंडितांनी उचललेले दिसतात.

'भूपाळ तो मम मनोमुकुरी उभासे'।।२०८।।

मनाच्या आरशात नलाचे प्रतिबिंब पडले आहे किंवा तुझे सौंदर्य पाहण्यासाठी जणू शरीरालाच हजारो डोळे फुटले आहेत.

क्वचित दंडी अगर दिंडी किंवा पदांमध्ये ऱ्हस्व-दीर्घाची ओढाताण झाली आहे. पण ही दोन्ही वृत्ते जातिवृत्ते असून संस्कृत अक्षरगणवृत्ताच्या मानाने शिथिल आहेत.

**५. समारोप :**

लौकिकाविषयी आस्था असणाऱ्या रंजनासाठी उत्सुक, आतुर अशा रसिकांसाठी विदग्धवृत्तीने केलेली ही काव्यरचना आहे. लोकांना जे जे आवडते, ते ते रमणीय करून सांगितले आहे. परंपरेचा स्वीकार करून रघुनाथपंडिताने आपल्या कथानकास नव्या रूपात नटविले आहे. रघुनाथाच्या कवितेचे सौंदर्य हे भावनांच्या ओसंडत्या प्रवाहाने उसळणारे सौंदर्य नाही. ते परिश्रमपूर्वक कुसरीने साधलेले सौंदर्य आहे. दमयंतीस्वयंवराख्यान हा संस्कृत काव्यादर्शाचा नेटका मराठी नमुना आहे. मायबोली मराठीत हे काव्य लिहून रघुनाथाने विदग्ध रसिकांचे समाराधन केले आहे. येथे मराठीला संस्कृतचा डौल प्राप्त झाला आहे.

लौकिकाकडे ओढ घेणारी जीवनासक्ती, मूलानुसरणाची स्वीकृत निष्ठा आणि स्वातंत्र्याची सळसळती ऊर्मी, मूलाशयाचा रसप्रफुल्ल आविष्कार आणि रचनेचा आरोप साधणारी संक्षेपप्रवृत्ती यांचा दमयंतीस्वयंवर हा सुरेख आविष्कार आहे.

क्वचित ठिकाणची दुर्बोधता व भावनाविलासाच्या वेळीही पडणारा कल्पनाचमत्कृतीचा मोह हे दोष आहेत. तरीही रसवत्ता व रचनाकौशल्य या दोन्ही दृष्टींनी दमयंती-स्वयंवर रमणीय उतरले आहे. विविध वाग्विभ्रमांनी रोचक बनलेली ही आख्यानकविता रूपमुग्धा आहे.

प्रवाही निवेदन, नाट्यात्म प्रसंगनिर्मिती, रेखीव स्वभावचित्रे, चटकदार व खटकेबाज संवाद, वाचकांना काव्यधुंद वातावरणात घेऊन जाणारा अभिजात कल्पना-विलास, प्रासादिक, वेधक वर्णने, सूचक संयमपूर्ण, कलात्मक भावनाविष्कार, कथावस्तूचा अखंड बंध, संस्कारपूत रसाळ गुणवती भाषा, अर्थालंकारांचा समुचित वापर, सर्वव्यापी रसात्मकता आणि वैचित्र्यपूर्ण वृत्तयोजना अशा विशेषांनी रघुनाथपंडिताच्या कवितेची गुणवत्ता वाढलेली आहे. मराठी कथात्मक कवितेच्या बोधवादी परंपरेत रघुनाथपंडिताची नितळ कलानिष्ठा उठून दिसणारी आहे.

सहायक ग्रंथ :


१. पंडित कवि - डॉ. के. ना. वाटवे.

२. प्राचीन मराठी पंडिती काव्य - डॉ. के. ना. वाटवे.

३. आख्यानक कविता- संपादक गं. ब. ग्रामोपाध्ये/ व.दि.कुलकर्णी/शंकर वैद्य.

४. प्राचीन मराठी कविपंचक - द.सि. पंगु.

५. मराठी आख्यानक कविता - प्रभाकर वासुदेव बापट.

६. पंडिती काव्य - डॉ. के. ना. वाटवे/डॉ. सौ. कुसुम कुलकर्णी.

७. मराठी आख्यानकविता : एक अभ्यास- प्रा.डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये.

८. प्राचीन मराठी आख्यान कविता- संपादक गजमल माळी.

९. महाराष्ट्र सारस्वत - संपादक वि. ल. भावे/ डॉ. शं. गो. तुळपुळे.

१०. प्राचीन मराठी वाङ्मयाचे स्वरूप - प्रा. डॉ. ह. श्री. शेणोलीकर.

११. प्राचीन मराठी आख्यानकविता : उद्गम आणि विकास - डॉ. शिवाजी गरुळकर.

१२. वरील लेखामधील कवितेच्या ओळी पुढील पुस्तकातून उद्धृत केल्या आहेत. रघुनाथपंडित-विरचित दमयंतीस्वयंवर : संपादक अ. का. प्रियोळकर, आवृत्ती तिसरी, जानेवारी १९६९, व्हीनस प्रकाशन, पुणे.


☆☆☆

# अभिव्यक्तीच्या स्वातंत्र्याचा गळा घोटणारे राज्यकर्त्यांचे जागतिक षड्‌यंत्र

डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी

संपन्न व प्रगत राष्ट्रांतील बहुराष्ट्रीय कंपन्यांना त्यांच्या बाजारापेठांच्या विस्तारासाठी हे जग मुक्त संचार करायला मोकळे रान करून हवे होते. 'माहितीच्या मुक्त संचार व प्रवाहासाठी' 'मुक्त जग' ही संकल्पना व घोषणा सत्तरीच्या दशकात जगभर त्यामुळेच देण्यात आली होती. ठिकठिकाणच्या अभिव्यक्तिस्वातंत्र्यवाद्यांना या घोषणेने आकर्षित केले होते. कोणत्याही राष्ट्राच्या कोणत्याही कायद्याचे कोणतेच अडथळे नको असणारे असे जग निर्माण करून घेण्यासाठी गेल्या काही दशकांत सर्वाधिक पायाभूत महत्त्वाची ठरलेली अशी कोणती साधनसामग्री असेल; तर ती प्रामुख्याने माहिती व संवादाच्या नवतंत्रज्ञानावर आधारलेली विविध प्रकारची, विविध स्वरूपांतली कोणत्याही स्वरूपाची माहिती व तिचा सर्वत्र मुक्त संचार. हाच नव्या उद्योगजगताचा, नव्या संगणकाधारित औद्योगिक क्रांतीचा व नव्या सांस्कृतिक साम्राज्यवादाचाही 'कच्चा माल' झालेला होता.

संगणकीय माहिती तंत्रज्ञानाच्या संवाद-माध्यमांशी लागलेल्या लग्नानंतर पारंपरिक संवादाचे, 'कम्युनिकेशन'चे रूपांतरच वेगवेगळ्या 'कॉम्प्युनिकेशन'मध्ये, संगणकीय स्वरूपाच्या संवादामध्ये झाले आणि वेगळ्या वेगळ्या संवादमाध्यमांतून चालणारा वेगवेगळ्या माध्यमांतला संवाद-व्यवहार हा एकाच वेळी शब्द-चित्र-रेखा-छायाचित्र-चलचित्र-ध्वनी-दृश्य अशा माध्यमांच्या परस्परांसोबत अतिशय प्रभावी अशा बहुआयामी, बहुमाध्यमी संवादसंप्रेषणात विलीन होऊन परिवर्तित झाला. मोठमोठ्या व्यवस्था, यंत्रणा व माध्यमांचे रूपांतर सूक्ष्मातिसूक्ष्म अशा तंत्रमाध्यमांमध्ये होत जाऊन त्याची उपलब्धता मोठ्या प्रमाणावरील लोकसंख्येला असावी, अशी धोरणे आखली गेली. माहिती-मनोरंजन आणि त्यावर आधारित संवाद-व्यवहाराचे रूपांतर बघता बघता 'स्वतंत्र' अशा, मात्र प्रचंड नफा प्राप्त करून घेणाऱ्या माहिती, वृत्त, ज्ञान, मनोरंजनाच्या, 'वस्तू' निर्माण करणाऱ्या माध्यमउद्योगातही झाले.

माहिती व संवाद-माध्यमाच्या तंत्रज्ञानाने जगात कोणत्याही घरातल्या, अगदी खासगी कामक्रीडेपासून तर सैन्याच्या गोपनीय हालचालीपर्यंत, अंतरिक्षयानाच्या यशस्वी प्रक्षेपण-व्यवस्थापन, संचालनापासून तर कार्यालयाच्या कामकाजापर्यंत, शिक्षणाचे पाठ, गृहपाठ प्रक्षेपणापर्यंत, जगातील हेरगिरीपासून तो सुरक्षेच्या नावावर साऱ्याच प्रकारच्या संवादावर 'नजर' ठेवण्याच्या माहिती तंत्रज्ञानापर्यंत, अगदी विश्वाचे संचालन करणारा मूलकण शोधून काढण्यापर्यंतदेखील वेगाने मजल मारली.

याच संवाद-माध्यमांच्या नवतंत्राच्या आधारे एकीकडे मूठभर बहुराष्ट्रीय कंपन्यांनी सारे जग हा आपल्या नफ्यासाठी केवळ एक बाजार करून सोडणारी व त्यासाठी सार्वभौम सरकारे, जनतेची सत्ता व जनकल्याणकारी धोरणे यांचा राष्ट्रांना त्याग करायला बाध्य करणारी व सर्वंकष भांडवली गुंतवणुकीची क्षमता असणाऱ्यांचेच नियंत्रण जगावर लादणारी अर्थव्यवस्था जगावर लादली गेली.

याच माहिती व संवादाच्या नवतंत्राधारित माध्यम-व्यवहारातूनच कुणाचेच नियंत्रण शक्य नसणाऱ्या अशा ('सोशल मीडिया' असा चुकीचा शब्दप्रयोग त्यासाठी आज केला जातो अशा) 'इंटरनेट' वरील मुक्त लोकसहभागाच्या, लोकचर्चांच्या, लोकमतांच्या अभिव्यक्तीचा नवसंवाद-माध्यमव्यवहारही साकारला गेला.

'इंटरनेट' या नव्या अनियंत्रित, खुल्या व मुक्त अभिव्यक्तीच्या संवाद-माध्यमामुळे जगातील हे माध्यम उपलब्ध असणाऱ्या व त्याद्वारे अभिव्यक्त होऊ इच्छिणाऱ्या प्रत्येकाच्या हाती साऱ्याच प्रकारच्या सर्वंकष आणि अनिर्बंध अशा सत्तांच्या विरोधात समाजाला व जगाला जागृत करून उभे करण्याचे संवादाचे, माहितीचे नवे माध्यमास्त्र लागले. ज्या माहिती व संवादाच्या नवतंत्रज्ञानाचा वापर व व्यापार करून ज्या सत्ता, जे






अनुक्रमणिका

बाजार, ज्या महासत्ता, जी सर्वंकष शोषण करणारी सत्ता वर्षानुवर्षे टिकून होती, त्यांचा बघताबघता पाडाव करण्याची लोकांना नवीच शक्ती त्यातून लाभली. लोकशाहीदेखील त्यामुळे छापील माध्यमांनी उदयाला आणलेली प्रातिनिधिक लोकशाही तेवढी उरली नाही. ती केवळ निर्वाचित प्रतिनिधींमार्फत केले जाणारे कायदे करून चालणारी यंत्रणा न उरता लोकच या माध्यमांमधून त्यांना हवे तसे कायदे व हवी ती रचना आकारास आणण्याचे साधन म्हणून हीच माध्यमे वापरू लागले.

'इंटरनेट'च्या या प्रकारच्या वापराने लष्करी व हुकुमशाही राजवटींच्या अरब राष्ट्रांतल्या सर्वंकष सत्तांचा पाडाव अल्पावधीतच घडवून आणला. लोकशाही या प्रकाराचा गंधही नसणाऱ्या राष्ट्रात लोकशाही सत्ता त्यामुळे येऊ लागल्या. तसेच जगभर रक्षणाचे, लोकशाहीचे स्वयंघोषित पोलिस म्हणून कुठेही शिरणाऱ्या अमेरिकेच्या वॉल स्ट्रीटपासून तर साऱ्या युरोपभरच रस्तोरस्ती प्रचंड प्रमाणावर आपला असंतोष व्यक्त करण्यासाठी लोकांना अल्पावधीतच एकत्र करू शकणारी संवादसामग्री म्हणून या माध्यमाचा उपयोग सिद्ध झाला. भारतासारख्या राष्ट्रातही या माध्यमांच्या जनसंघटनासाठी झालेल्या प्रभावी वापरानंतर केवळ सत्ताधाऱ्यांच्या, बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या भांडवलदारी शोषकांच्या हातची, त्यांचा पारंपरिक विशेषाधिकार झालेली ही संवादमाध्यम खेळणी जनता परिणामकारक रीत्या लोकसंघटनासाठी वापरू शकते, हे सिद्ध झाले.

परिणामतः त्यातून चालणारा हा नवा शोषकसत्ता व शोषक व्यवस्थाविरोधी लोकसंवाद आपल्या नियंत्रणात, आपल्या नजरेखाली व आपल्याला हवा तसा व तेवढाच चालावा व नको तो 'राष्ट्रविरोधी', 'समाजविरोधी', 'विकासविरोधी' म्हणून बंद पाडता यावा, याची कटकारस्थानेही प्रभावीपणे व वेगाने आकारास येऊ लागली.

'इंटरनेट'च्या अशा लोकोपयोगी व जनसंघटनात्मक मुक्त वापरावर नियंत्रणे आणण्याच्या जगभरातील सर्वच हालचालींविरुद्ध सुमारे ६५ हजार लोकांनी भारतातील दहा प्रमुख शहरांमध्ये नुकतीच जी संघटित निदर्शने केली, त्यामुळे भारतीय जनतेचेही लक्ष मोठ्या प्रमाणावर या कारस्थानांकडे वेधले गेले आहे.

ज्या ज्या माध्यमांचा, लोक आपला असंतोष व्यक्त करण्यासाठी व आपल्या अभिव्यक्तीसाठी वापर करतील, त्याभोवती गोळा होतील, ती ती माध्यमे आपल्या नियंत्रणात असावी याचा प्रयत्न सर्वच प्रकारच्या राजसत्तांपासून तर माध्यमसम्राटांपर्यंत सर्वांनीच प्रत्येकच काळात प्रच्छन्नपणे सत्तेचा दुरुपयोग करून केलेला आहे.

जनमाध्यमे ही जगभरच प्रत्येक प्रकारच्या राजसत्तेने नेहमीच आपल्याच तेवढ्या नियंत्रणात राखलेली होती. ती त्यांच्या हातून काढून जनतेच्या हाती असावीत, यासाठी जगभरच मोठमोठी जनआंदोलने सत्तरीच्या दशकात उभारली गेली. जनआंदोलनांचा प्रभाव पाहून, लोकांचे व्यक्त होण्याचे घटनादत्त मूलभूत अधिकार जेथे होते, तेथे ते राज्यकर्त्यांकडून स्थगित करण्यात आले होते. त्याविरुद्धच्या संघर्षाने राजसत्ता उलथवून झाल्या. नव्या सत्ता आल्या, नवे कायदे आले. माध्यमे 'मुक्त' झाली. युनेस्कोच्या पुढाकाराने माहितीच्या मुक्तसंचारासाठी माहिती व संवादाची नवी जागतिक व्यवस्था रचली गेली. अर्थात ही व्यवस्था नव्या जागतिक मुक्त अर्थव्यवस्थेसाठी जगभरातील जनमानसाचा संवाद-माध्यमाद्वारे ताबा घेण्यासाठी होती. सार्वभौम अशा निर्वाचित सरकारांच्या हातून जनमाध्यमे काढून घेऊन जगभरची जनमाध्यमे जनतेच्या हाती सोपवण्याचा पुढाकार घेणारे ते संघर्ष हे मुळातच माध्यमसम्राटांच्या छुप्या माध्यमसाम्राज्यवादी शक्तींनी पुरस्कृत केलेले संघर्ष होते. हे पुढे जनतेच्या नावावर ही माध्यमे जेव्हा काही मूठभरच बहुराष्ट्रीय व त्यांच्या तथाकथित राष्ट्रीय कंपन्यांच्या साम्राज्याची सामग्री ठरली, तेव्हा लोकांच्या लक्षात आले. या प्रक्रियेत तीन दशकांचा काळ मात्र निघून गेला. रुपोर्ट मर्डोक सारखे अनेक माध्यमसम्राट याच काळात निर्माण झाले.

राजसत्तेच्या नियंत्रणाची जागा या बहुराष्ट्रीय कंपनी साम्राज्याच्या बाजारवादी आशयविषयक नियंत्रणांनी घेतली गेली. बाजाराला हवे तसे, हव्या त्या रुची-अभिरुचीचे संवाद, संपर्क जलद घडवणारी अभिव्यक्ती ही प्रामुख्याने 'मुक्त' माहितीचा 'मुक्त' संचार ठरला; ठरवला गेला. जनता मात्र मुक्ततेचा अनुभव घेण्याऐवजी अधिक बंदिस्ततेचा अनुभव घेऊ लागली. ज्यांनी निर्वाचित सरकारच्या जागी

ही नियंत्रणे आपल्या हाती एकवटून घेतली, त्यांच्याही नियंत्रणाबाहेर याच संवाद-माध्यमांच्या नवतंत्रज्ञानाने दिलेल्या त्याच वरदानामुळे आता हे सारे गेले असून आता त्यांनीच त्यांच्या विस्तारासाठी निर्मिलेले 'इंटरनेट'व ही नवतंत्रज्ञाने त्यांनाच 'भस्मासूर' वाटू लागली आहेत. कारण ही माध्यमे आता संवादाची खऱ्या अर्थाने लोकांसाठी 'मुक्त' वापराची तंत्रज्ञाने होऊ पाहत आहेत. सत्तेच्या व शोषणाच्या व्यवस्थेला मोठे हादरे त्यामुळे बसू लागले आहेत. परिणामी निर्वाचित सरकारांच्याच मार्फत आता या माध्यमांवर नियंत्रणे आणण्याची बाजाराची, त्यांच्या सत्ताधीश होण्याशी व टिकून राहण्याची संधी असणाऱ्यांची कारस्थाने तीव्र होऊ लागली आहेत.

तरीही 'इंटरनेट' हे माध्यम नियंत्रित करणे वाटते तेवढे सोपे काम नाही. ट्युनिसच्या २००५च्या परिषदेमध्ये 'इंटरनेट' बाबत जे ठरवण्यात आले होते, त्याचे ब्रीद "सत्याच्या पलीकडे अन्य काहीच चालू शकणार नाही", हे होते. ट्युनिसच्या त्या परिषदेला जगभरातील विविध प्रकारचे १९ हजार प्रतिनिधी उपस्थित होते. १२२ परिच्छेद असलेला ट्युनिसच्या परिषदेचा जाहीरनामा हा 'इंटरनेट'-वर नियंत्रणे लादू इच्छिणाऱ्यांच्याच विरोधात जाणारा जाहीरनामा आहे.

'इंटरनेट' हे आज जगभरच खऱ्या अर्थाने विविध प्रकारच्या खुल्या, मुक्त, सर्जक, कल्पक अशा जनाभिव्यक्तीचे व ज्ञानाच्या, माहितीच्या आदान-प्रदानाचे लोक-माध्यम समजले जाते. याच माध्यमामुळे 'विकी लिक्स' मधून साऱ्याच सरकार, सत्ताधीश व त्यांच्या भ्रष्ट युत्यांनी केलेली कारस्थाने क्षणार्धात उघड झाली. ती उघड करणारा ज्युलियन असांजे त्यामुळेच सत्ताधीशांना 'देशद्रोही' ठरविण्यासाठी ताब्यात हवा आहे.

या माध्यमावर अतिशय कठोर अशी नियंत्रणे लादली जाण्याच्या दृष्टीने जगातल्या अनेक राष्ट्रांत सरकारी पातळीवर हालचाली सुरू झाल्या असून येत्या नोव्हेंबर-डिसेंबर, २०१२ मध्ये दुबई येथे होऊ घातलेल्या सभेत युनोच्या व्यासपीठावर याबाबत काही निर्णयही घेतले जाणार आहेत. याची पुरेशी माहिती हे माध्यम वापरणाऱ्यांना अद्यापही नाही.

दुर्दैवाने अशी नियंत्रणे लादण्यात पुढाकार घेण्याची घाई मात्र भारतासारख्या, वंचितांच्या जगाचे, साम्राज्यवादाविरुद्धच्या लढ्याचे नेतृत्व केलेल्या आपल्या राष्ट्राच्या सरकारने चालवली असून आपल्या संसदेतही त्याबाबत चर्चा न करता भारत सरकारने २६ ऑक्टोबर,२०११ च्या युनोच्या सर्वसाधारण सभेसमोर मांडण्यासाठी याबाबतचा एक प्रस्ताव पाठवला असल्याची माहिती समोर आली आहे. या प्रस्तावानुसार जगातील विविध राष्ट्रांतील ५० शासकीय अधिकारी व राजकारण्यांचा समावेश असणारी युनोची एक समिती स्थापली जाऊन ती 'इंटरनेट' माध्यम नियंत्रणाबाबतची सर्वोच्च जागतिक समिती असावी, असे या प्रस्तावाचे स्वरूप आहे. त्यानुसार जगभरातील लोकांची अभिव्यक्ती कशी असावी, कशी नसावी, हे ठरवण्याचा अधिकार विविध राष्ट्रांतील मूठभर असे ५० व तेही फक्त सरकारी अधिकारी आणि राजकारणी मिळून ठरवणार आहेत. **अभिव्यक्तीवरील बंधनांच्या जगातल्या आजवरच्या इतिहासात लादली गेली नसेल, अशा स्वरूपाची ही भयंकर नियंत्रण-व्यवस्था असेल.**

युनोने मात्र 'इंटरनेट' स्वातंत्र्याचाच पुनरुच्चार केला आहे. परंतु भारत, चीन, रशिया या राष्ट्रांचा त्याला विरोध आहे. लोकांच्या अभिव्यक्ती-स्वातंत्र्यासाठी साम्राज्यवादविरोधी शक्तींशी लढा देऊन, तिसऱ्या जगाचे मुक्तिलढे प्रेरित करणाऱ्या भारताचे सरकार हे आपल्या देशातील नागरिकांसह जगभरातील अभिव्यक्तीवरील स्वातंत्र्याच्या विरोधात उभे होताना जे दिसते आहे, त्याबाबत आपण काही बोलायचे की मूग गिळून बसायचे?

लोकाभिव्यक्तीच्या नियंत्रणाचीच जागतिक व्यवस्था भारताने दिलेल्या प्रस्तावातून आकार घेणार आहे. योगायोग म्हणजे ज्या इंदिरा गांधींनी भारतावर अभिव्यक्ती-स्वातंत्र्याचा गळा घोटणारी आणिबाणी १९७५ मध्ये लादली होती, त्यांचे राजकीय वारसदार असणाऱ्या पक्षांचे व त्यांच्या समर्थकांचे सरकारच तीच आणिबाणी एक प्रकारे या प्रस्तावाद्वारे आता साऱ्या जगावर लादायला निघाले आहे.

१९७५ च्या आणिबाणीविरुद्धचा संघर्ष हा ती भारतभर लादली गेल्याने केवळ भारतभर पसरला होता. आता हा प्रस्ताव युनोने स्वीकारण्यास बाध्य केले गेले,








तर तोच संघर्ष साऱ्या जगभर पसरल्याशिवाय नक्कीच राहणार नाही. 'ॲनॉनिमस' या संघटनेने त्याविरुद्धच्या संघर्षाची मुहूर्तमेढ या देशातही ६० हजार लोकांमार्फत देशभरात दहा प्रमुख ठिकाणी निदर्शने करून देशभर रोवलीच आहे.

जगभरातील सर्वच प्रकारच्या सत्ता, मग त्या बाजारांच्या असोत वा लोकशाही, त्यातील राज्यकर्ते आणि सत्ताधीश यांना २०११ या वर्षभरात या माध्यमाच्या प्रथमच जगभर झालेल्या जनसंघटनकारी प्रभावी वापरामुळे एवढे जे भयभीत करून सोडले आहे, त्यामुळे या माध्यमाची लोककल्याणकारी ताकद जगभर प्रथमच वेगाने लक्षात आलेली आहे.

'सोशल' मीडिया असे या माध्यमाचे केले गेलेले व प्रचारात आणून वापरात सुस्थापित केले गेलेले नामकरण मात्र अत्यंत चुकीचे आहे. ज्या अंगाने व ज्या अर्थाने या माध्यमाच्या ज्या प्रकारच्या ताकदीकडे बघितले जाऊन या पद्धतीच्या नियंत्रणांचा विचार केला जातो आहे, ते सारे बघता त्याला 'सोशल' मीडिया असे संदिग्ध रीत्या न संबोधता खऱ्या अर्थाने 'जनकल्याणकारी' संबोधले गेले पाहिजे; तरच या माध्यमावरील नियंत्रणाच्या विरोधातील आंदोलनाला ते केवळ उच्चभ्रूंचे आंदोलन न उरता लोकानुवर्ती वळण लागू शकेल. केवळ आंदोलनालाच नव्हे तर 'इंटरनेट' या माध्यमाला व त्यातून प्रवाहित आशयालादेखील असे नियंत्रणमुक्त जनकल्याणकारी वळण लागू शकेल. तसे ते लागण्याची आज नितान्त गरज आहे. कारण कोट्यवधी रुपयांच्या गुंतवणूक, नफा व जाहिरातदार आणि उत्पादक यांच्या ताब्यात गेलेली जनमाध्यमे ही आता मालकांची माध्यमे झाली असून ती पत्रकारांची व जनांची, जनतेची माध्यमेच उरलेली नाहीत.

भारताने दिलेल्या प्रस्तावापाठोपाठ ब्रिटननेदेखील आपल्या राष्ट्रात 'इंटरनेट' माध्यमावरील सर्वंकष नियंत्रणाची योजना आखली असून प्रत्येक ई-मेल, प्रत्येक फोनकॉल, अथवा अशा कोणत्याही प्रकारची देवाण-घेवाण ही राज्याच्या नियंत्रणाखाली आणून त्यावर शासनाच्या हाती नियंत्रणसत्ता एकवटणारे कायदे व त्याचे विधेयक ब्रिटनच्या संसदेसमोर लवकरच येऊ घातले आहे. सत्तारुढ पक्षातील अनेक खासदारांचा विरोध असूनही ते विधेयक सरकार पुढे रेटणारच आहे; सत्तेचा तो स्वभावच झालेला आहे. मग राज्यकर्ते कोणत्याही देशातील कोणत्याही पक्षाचे असोत.

एके काळी जॉर्ज ऑरवेलच्या जगप्रसिद्ध 'ॲनिमल फार्म' या रूपक ग्रंथाने कम्युनिस्ट रशियातील अभिव्यक्ती-वरील अशा प्रकारच्या पोलादी नियंत्रणाच्या विरोधात जगभर कम्युनिस्टविरोधी वातावरण निर्माण केले होते. त्या वेळी तर 'इंटरनेट' सारखे लोकसंवादाचे प्रभावी माध्यम उपलब्धही नव्हते.

कम्युनिस्टांना अभिव्यक्ती-स्वातंत्र्याचे व लोकशाही स्वातंत्र्याचे मारेकरी ठरवून, तथाकथित मुक्त लोकशाहीचा स्वयंघोषित नैतिक ठेका केवळ स्वतःकडे खेचून घेतलेली अमेरिका व पाश्चात्त्य लोकशाही राष्ट्रे व त्यांच्या पावलावर आता पाऊल ठेवणारी भारतासारखी राष्ट्रे आता साऱ्या जगभरातील प्रत्येकच व्यक्तीच्या खासगी जीवनावर, परस्परसंवादावर व त्यांच्या घराघरांत डोकावून साऱ्यांचे सारे खासगी जीवनच सुरक्षेच्या नावावर ज्या प्रकारे राज्याच्या नियंत्रणाखाली आणू पाहत आहेत, त्या सर्वंकष वृत्तीला जगाच्या इतिहासात तोड नाही.

जणू प्रत्येकच व्यक्ती ही त्यांच्या दृष्टीने संशयित गुन्हेगार ठरणार आहे. प्रत्येकाच्या प्रत्येक शब्दावर, हालचालीवर त्यामुळे नियंत्रण ठेवण्याची त्यांना गरज आहे, असा याचा अर्थ होतो. जो गुन्हेगार नाही त्याने घाबरण्याचे कारण नाही, असे सांगण्याची मखलाशी करून हे नियंत्रण मिळवू बघणाऱ्या राज्यकर्त्यांवर जनतेचा काडीचा विश्वास नाही. कारण अशा प्रकारच्या अधि-कारांचा दुरुपयोग राज्यकर्त्यांनी त्यांना विरोध करणाऱ्या निर्दोष व निरपराध्यांनाही तुरुंगात डांबण्यासाठी करून झाल्याचाच इतिहास सर्वत्र विपुल प्रमाणात उपलब्ध आहे. जगभरातील लोकांच्या अभिव्यक्ती-स्वातंत्र्याच्या वाढत्या अपेक्षा, आकांक्षा यांच्या पूर्तीसाठी संवाद-माध्यमांचे नवतंत्रज्ञान पुरेसे वापरले जाण्याअगोदरच त्या आकांक्षांना सुरुंग लावण्याच्या जगभरातील बाजारकर्त्यांचे, राज्यकर्त्यांचे हे प्रयत्न जगभरातच एका वेगळ्या नव्याच असंतोषाची निर्मिती करणार, हे स्पष्टच आहे.

लोककल्याणकारी नियोजन प्रामाणिकपणे करून,

तशी धोरणे राबवून लोकांना संतुष्ट राखण्याऐवजी कुठलाही असंतोष हा 'समाजविरोधी', 'राष्ट्रविरोधी', 'दहशतवादी', 'विकासविरोधी' ठरवता येण्याचे व तो दडपून टाकण्याचे अधिकार मागणाऱ्या कायद्यांची संख्या वाढवण्याचे राजकीय व्यवस्थापन हा लोकांचे नियमन करण्याचा शांततामय व सभ्य असा सांस्कृतिक मार्ग ठरूच शकत नाही.

मात्र असे असभ्य व असांस्कृतिक वर्तनच राज्य या संस्थेकडून जगभर घडणार आहे. कारण राज्यसंस्थेने राज्य-समाजवादाच्या ऐवजी भांडवलवादी राज्याचे धोरणच जगभर स्वीकारले आहे. पहिला अणुबाँब बनविणाऱ्या कुविख्यात मॅनहटन प्रोजेक्टचा सूत्रधार इंजिनियर वन्नेवर बुश याने जगभरातील अमेरिकन प्रभुत्वासाठी राज्य, सैन्य, शास्त्रज्ञ व व्यापारी यांच्या ऐक्याचा सिद्धांत मांडला होता. त्या आधारे अमेरिकेने जे 'वर्चस्व' जगभर स्थापले, त्याच सिद्धांताचा स्वीकार आता जगातील बहुतांश राष्ट्रांतील राज्यकर्त्या वर्गाने केला आहे.

त्याचाच परिणाम म्हणून राष्ट्रांच्या सीमा ओलांडणारी ही जगातील सारे राज्यकर्ते, शास्त्रज्ञ, व्यापारी व सैन्य यांची ही युती एकीकडे, तर जगातील सुबुद्ध, प्रबुद्ध आणि वंचित जनता दुसरीकडे अशी जगाची नवीच फाळणी आकाराला आली आहे.

संवाद-माध्यमांचे नवतंत्रज्ञान हे जोवर वर्चस्ववादी अशा राजकीय व बाजाराच्या सत्तानिर्मिती व प्रचार-प्रसारासाठी सोयीचे होते, तोवरच ते सर्वत्र संचारासाठी 'मुक्त' माध्यम म्हणून वापरले गेले, गौरवले गेले. आता 'इंटरनेट' सारखे सुलभ व स्वस्त माध्यम हे कोणत्याही प्रकारच्या वर्चस्वाविरुद्धच्या अभिव्यक्तीसाठी लोकमाध्यम व लोकशक्तीच्या स्वरूपात जगभर आकार घ्यायला सुरुवात होताक्षणीच त्याच्या जागतिक नियमन व नियंत्रणाची व्यवस्था ही दहशतवादाचे व सुरक्षेचे भय दाखवून वेगाने उभी करण्याचे प्रयत्न केले जात आहेत.

'सोशल मीडिया' नावाने संबोधल्या जाणाऱ्या या माध्यमांमधून लोकांची अभिव्यक्ती आत्ता आत्ता कुठे जेमतेम आपला प्रभाव दाखवण्याच्या बाल्यावस्थेतच असताना तिचा गळा घोटण्याचे हे प्रयत्न सरू झाले आहेत.

खरेतर संवादाच्या या नवतंत्रज्ञानामुळे मुख्य प्रवाही जनमाध्यमे समजल्या जाणाऱ्या वृत्तपत्रे, दूरचित्रवाणी, रेडिओ यांसारख्या माध्यमसम्राटांच्या हाती एकवटलेल्या माध्यमातील आशयापेक्षा वेगळे आशय, वेगळे सत्य व त्यातून दडपले जाणारे वास्तव असंख्य लोकांच्या, संक्षिप्त अशा शब्दसंख्येतूनदेखील जगभर प्रवाहित करण्याची साधने उपलब्ध झाली. त्याने मुख्य प्रवाही जनमाध्यमांची विश्वासार्हतादेखील धोक्यात आली आहे. ही माध्यमे प्रचंड भांडवली गुंतवणूकदार असणाऱ्यांचीच तेवढी आज माध्यमे आहेत. लोकांच्या स्वस्त व सुलभ माध्यमातील अभिव्यक्तीवर नियंत्रणे न आणली गेल्यास कोट्यवधींच्या नफेखोरीची सुव्यवस्था झालेली मुख्य प्रवाही माध्यमे धोक्यात येऊन 'इंटरनेट' माध्यमातील 'सोशल' मीडिया हेच मुख्य प्रवाही लोकमाध्यम म्हणून प्रतिष्ठित होण्याचा धोका माध्यमसम्राटांसमोर, त्यांच्या माध्यम-साम्राज्यवादासमोर, पर्यायाने त्यांची समर्थक बाजारव्यवस्था व त्यावर पोसले जाणारे राज्यकर्त्यांचे वर्ग यांच्यासमोर आज उभे ठाकले आहेत.

या नवमाध्यमांमुळे राज्यकर्ते आणि नफेखोरांच्या युतीची लक्तरे वेशीवर टांगली जाऊन ते वेगाने नागवे होऊ लागले आहेत. खऱ्या अर्थाने 'लोकसत्ताक' असे या नवमाध्यमांचे स्वरूप होत असल्याने एके काळी जनसत्तेची वाहक ठरलेली जनमाध्यमे ही शोषकांच्या सोयीची साधने म्हणून उघडी पडू लागली आहेत. आता तर प्रत्येक चौक, गल्ली आणि मोहल्ला डॉट कॉम स्थापले जाऊन त्याद्वारे आपली अभिव्यक्ती जगभर पोचवण्याचे साधन म्हणून लोक ही माध्यमे वापरू लागले आहेत. आपआपल्या भाषा, बोली, संस्कृती यांच्यावरचे हल्ले परतवून लावून त्या सुस्थापित करण्याची-देखील ती साधनसामग्री ठरू लागली आहे.

जनमाध्यमांनी गमावलेली आपली विश्वासार्हता मुख्य प्रवाही माध्यमांपासून लोकांना दूर नेत असून या नव्या माध्यमांमधून विश्वासार्हतेचे नवे वातावरणही निर्माण होते आहे. प्रचंड प्रमाणावरील लोकसंख्येसाठी टोकाची विपन्नता, विषमता, अनेक प्रकारची टोकाची वंचितता निर्माण करणारी व मूठभरांचीच तेवढी सुरक्षा, संपन्नता व चंगळ साधणारी धोरणे राबवण्यातूनच अनेक प्रकारची

दहशत, हिंसा, असंतोष जन्म घेत असतो. तो नाहीसा करणाऱ्या 'बहुजनहिताय बहुजनसुखाय' धोरणांचा त्याग करून केवळ दहशत व असुरक्षेचे भय कायम टिकवून त्यावरील उपाय म्हणून लोकाभिव्यक्ती दडपण्यासाठी नवनवे कायदेशीर अधिकार तेवढे राज्याकडे एकवटणारी व्यवस्था आकाराला आणायची, एवढेच राज्य करण्याचे तंत्र जगभरच्या राज्यकर्त्यांनी सध्या स्वीकारलेले दिसते. त्याचाच परिणाम म्हणून 'इंटरनेट' सारख्या लोकाभिव्यक्तीचे सुलभ व स्वस्त लोकमाध्यम ठरू बघणाऱ्या माध्यमावरील प्रत्येकाच्या व्यक्तिगत हालचालीवर, प्रत्येकालाच 'पोटेंशियल गुन्हेगार' ठरविणाऱ्या या स्वरूपाच्या नियंत्रणांचा विचार केला जातो आहे. तो तसा करणे हे प्रत्येकच व्यक्तीचा केवळ अधिक्षेप करणेच नव्हे; तर युनोने सिद्ध केलेल्या व जगभरातील राष्ट्रांनी स्वतःच स्वीकारलेल्या मानवी हक्काच्या सनदेलाच छेद देणारे ठरणार आहे.

जगातील सर्व राज्यकर्ते विरुद्ध जगभरातील जनता अशा वेगळ्या जागतिक संघर्षाची ठिणगी यातून पडू घातली आहे.

☆☆☆

---

# कुसुमाग्रजांचा साहित्यविचार

श्री. विजय रैवतकर

वि. वा. शिरवाडकर मराठी साहित्यविश्वात कवी, नाटककार आणि कादंबरीकार म्हणून सर्वपरिचित आहेत. मराठी वाङ्मयप्रकारांत त्यांच्या लेखणीने अमीट छाप उमटविलेली आहे. त्यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व ह्या तीनही प्रकारांतून विलक्षण सामर्थ्याने पुढे आले. त्यांच्या वाङ्मयीन कारकिर्दीला सलाम म्हणून त्यांचा जन्मदिवस जागतिक मराठी दिन म्हणून साजरा केला जातो.

वि. वा. शिरवाडकर हे केवळ नाटककार, कवी किंवा कादंबरीकार नव्हते; तर ते साहित्यद्रष्टेदेखील होते. त्यांनी त्यांची साहित्यविषयक भूमिका विविध प्रसंगोपात्त व्याख्यानांतून, लेखांतून व्यक्त केली. त्यांच्या या लेखनातून त्यांच्या साहित्यविषयक दृष्टिकोणाचा आपणास परिचय होतो आणि कुसुसाग्रजांनी मांडलेल्या किंवा व्यक्त केलेल्या साहित्यविचाराचे स्वरूप लक्षात येते.

वि. वा. शिरवाडकरांचा साहित्यविचार एकत्रित रीत्या अभ्यासता येत नाही. त्यांच्या साहित्यविचाराचा परिचय त्यांच्या विविध भाषणांतून आणि लेखांतून होतो. कुसुमाग्रजांनी साहित्यविषयक विस्तृत चर्चा केली आहे. त्यातून त्यांच्या विविधांगी दृष्टिकोणाचा परिचय होतो, तसेच साहित्याच्या संदर्भात त्यांची भूमिकाही स्पष्ट होते. त्यांनी साहित्यविषयक गंभीर चिंतन केले आहे. त्यातून त्यांच्या साहित्यविषयक दृष्टिकोणाचा उलगडा होतो.

साहित्यात प्रकट होणारे अनुभव, अनुभवाच्या प्रकटीकरणाचे स्वरूप, साहित्यातील सामाजिकता, साहित्यातून प्रकट होणारा अंतर्मनाचा आविष्कार, साहित्यनिर्मितीच्या मागे असणाऱ्या विविध प्रेरणा, काव्यविषयक उद्दिष्टे, वाङ्मयीन गुणवत्तेचे निकष आणि साहित्याची बांधीलकी अशा विविध घटकांतून कुसुमाग्रजांचा साहित्यविचार प्रसृत झालेला आहे. या घटकांची सर्वांगीण मीमांसा कुसुमाग्रजांनी केली आणि तिची योग्य मांडणीही केलेली आहे. या साहित्यघटकांच्या संदर्भात प्रकट झालेल्या कुसुमाग्रजांच्या साहित्यविचाराचे स्वरूप कसे आहे, ते आपण समजून घेऊ या.

कुसुमाग्रजांनी साहित्याला साहित्यत्व दोन तत्त्वांमुळे प्राप्त होत असल्याचे सांगितले आहे. अनुभव आणि आविर्भाव या दोन तत्त्वांमुळे साहित्याचे साहित्यत्व सिद्ध होत असल्याचे ते म्हणतात. आविर्भाव म्हणजे जे अरूप आहे किंवा विरूप आहे. परिणामकारक सौंदर्यबुद्धीला आवाहन करणारी प्रवृत्ती आणि त्या प्रवृत्तीकडून होणारे कार्य यास कुसुमाग्रज आविर्भाव असे म्हणतात. अनुभव हा मुळात निराकार आणि मनोमय असल्याचे ते सांगतात.

आविर्भाववृत्ती ही शब्दांच्या साहाय्याने अनुभवाला आकार देते आणि वास्तवातील अस्तित्व प्राप्त करून देत असते. आविर्भावाचे नियमन, विशेषतः समाजाने दिलेला शब्द, साहित्यक्षेत्रातील प्रचलित परंपरा, त्या सांभाळण्याची अथवा तोडण्याची प्रवृत्ती आणि आवश्यकता, परिसरातील बदलती परिस्थिती इत्यादींतून होत असते, असे कुसुमाग्रज सांगतात. कुसुमाग्रजांनी शब्दाला आविर्भावाचे प्रमुख साधन मानले आहे. तथापि, ते केवळ शब्दरूपाच्या आविष्कारालाच महत्त्व देत नाहीत, तर ते अनुभवालाही तितकेच महत्त्व देतात. अनुभवाच्या रूपातून ते साहित्याच्या आशयाला शोधताना दिसतात. ते म्हणतात,"साहित्याच्या कोणत्याही प्रकारात निराशयता किंवा निरर्थकता ही अस्वाभाविक आणि साहित्याच्या उद्दिष्टांशी विसंगत अशी मानावी लागेल."[१] म्हणजेच लेखक, कवी हे केवळ शब्दांची निवड करतात, त्यांच्या रंग, रूपाचीच पारख करतात असे नाही; तर त्याद्वारे सुसंगत आशय उत्पन्न करण्याचे कार्य करत असतात, हे कुसुमाग्रजांना आवर्जून सांगायचे आहे. साहित्याच्या आकाररूपाबरोबरच साहित्यातून प्रकट होणारा आशय कुसुमाग्रजांना तितकाच महत्त्वाचा वाटतो. आविर्भावाने साहित्याचे रूप ठरते, तर अनुभवाने त्याचा आशय निश्चित होते. आविर्भाव आणि अनुभव यांचा संयोग निर्माण

झाल्यास साहित्याचा योग्य पोत तयार होत असल्याचे कुसुमाग्रज सांगतात. कुसुमाग्रजांनी या साहित्यत्वात अनुभवाला विशेष महत्त्व दिले आहे. कुसुमाग्रज म्हणतात, "आविर्भावाचे सामर्थ्य प्रभावी आहे; परंतु अनुभव घेण्याची शक्ती जर संकुचित, बोथट आणि केवळ वरच्या थराला स्पर्श करणारी असेल, तर त्याचे साहित्य उथळ आणि घायपाताच्या रेशमी कापडासारखे दिखाऊ, परंतु तकलादू होण्याची शक्यता असते"[२] म्हणजेच कुसुमाग्रजांच्या दृष्टीने, अनुभवाच्या संदर्भात साहित्यिक हा जास्तीत जास्त साहित्यिक असल्याचे लक्षात येते. साहित्यिकाच्या अनुभवशीलतेवर त्याच्या साहित्याचे कमीअधिक मोल ठरत असल्याचे कुसुमाग्रज सांगतात. याचाच अर्थ असा की, आविर्भावसामर्थ्य प्रभावी असूनसुद्धा योग्य अनुभवाच्या अभावी साहित्याला श्रेष्ठ कलाकृतीचे स्वरूप येत नसते. आशय आणि आकार यांत सुसंवाद असतो आणि तसा तो असणे कुसुमाग्रजांच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचे आहे. याशिवाय साहित्याला साहित्यत्व प्राप्त होत नाही. काव्य, कथा अथवा कादंबरी वा कोणतेही वाङ्मयप्रकार असोत; ह्यांना अनन्यसाधारणता प्राप्त होते ती अनुभवाच्या संदर्भातच, असे कुसुमाग्रज यांचे मत आहे. कुसुमाग्रज म्हणतात, "अपार आणि अनंत अशा जीवनाचा एक तुकडा म्हणजेच एक जाणीव लेखककवीच्या मनात प्रवेश करते. जागृत वा सुप्तावस्थेत असलेल्या इतर संबंधित जाणिवांचे या जाणिवेवर काही संस्कार होतात आणि या संस्कारांमुळे पूर्णरूप पावलेला त्याचा अनुभव कथा, नाट्य अथवा काव्य अशा कलाकृतीच्या द्वारे व्यक्त होतो."[३] एकूणच अनुभव ही लेखकाच्या मनात उद्भवणारी एक भावावस्थेतील जाणीव असल्याचे कुसुमाग्रज सांगतात.

कुसुमाग्रज साहित्यासंबधीचा विचार संप्रदायनिरपेक्ष-दृष्ट्या करतात. त्यांना साहित्याच्या संदर्भात एखाद्या वादाच्या किंवा तत्त्वाच्या अनुषंगाने साहित्यलेखन करणे मान्य नाही. साहित्याचा प्रांत हा मूलतः सीमाहीन आणि सर्वसमावेशक मानायला हवा, अशी त्यांची भूमिका आहे. साहित्याचे संप्रदायसापेक्ष लेखन करणे कुसुमाग्रजांना मान्य नाही. ते या संदर्भात विरोध दर्शवताना म्हणतात, साहित्याला विविध प्रकारची कुंपणे घालायची आणि त्याच्या गळ्यात जानवी अडकविण्याची खटपट करणे हे साहित्याच्या मूलतत्त्वाशी विरोधी आणि संकुचित दृष्टीचे द्योतक आहे. कुसुमाग्रजांनी विशेषतः कलावाद, जीवन-वाद, सौंदर्यवाद, नीतिवाद या संदर्भात परखड मीमांसा केली आणि या संदर्भात साहित्याच्या सर्वसमावेशक विचारतत्त्वांची मांडणी केली आहे.

साहित्याने नैतिक असलेच पाहिजे, अशा अपेक्षांना कुसुमाग्रज भ्रामक ठरवतात; तसेच साहित्यातून सामाजिक विचार दिसला की, अब्रह्मण्यं म्हणून हाकारा करणाऱ्यांना कुसुमाग्रज शतपटींनी भ्रामक ठरवतात आणि ते साहित्यि-काच्या अनुभवाला विशेष महत्त्व देतात. कुसुमाग्रज म्हणतात, "साहित्यिकाच्या अनुभवाचा जेवढा विस्तार, तेवढाच साहित्याचाही. त्यात हे नको, ते नको असे मनाईहुकूम जारी करणे म्हणजे स्वतःच्या निर्मितीच्या मर्यादा सर्व साहित्यावर लादण्यासारखे आहे."[४] म्हणजेच विशिष्ट अनुभवाच्या अर्ध्याकच्या तुकड्यावर साहित्याचा निर्वाह होणे हे कुसुमाग्रजांना मान्य नाही. सर्वानुभव हीच समृद्ध आणि प्रगत साहित्याची पहिली शर्त असल्याचे सांगून अनुभवाची कक्षा कालमानाने वाढत असते व काळाचे संस्कार त्यावर होत असतात; त्यातून कलाकृती अधिकाधिक जिवंत होत असल्याचे कुसुमाग्रज सांगतात.

साहित्यातून व्यक्त होणाऱ्या अंतर्मनाच्या आविष्कारा-संबंधी विवेचक मांडणी कुसुमाग्रज करतात. साहित्यातून माणसाच्या तलस्पर्शी मनाचा, अंतर्मनाचा वाङ्मयीन आविष्कार झाल्यास त्याचे कौतुक असल्याचे कुसुमाग्रज सांगतात; पण हे नित्याचे रूप होऊ नये,असेही बजावतात. कारण साहित्य हे अंतर्मनातील विकृतीचा आविष्कार करणारे दवाखाने नव्हेत. साहित्यिक म्हणजे मनोव्यापारांची मोठ्या हुशारीने परीक्षा करणारे मनोवैद्यही नव्हेत.

साहित्यातून प्रकट होणाऱ्या मनोव्यापाराच्या संदर्भात कुसुमाग्रज म्हणतात, "साहित्य ही मनाची निर्मिती असल्यामुळे मानसशास्त्राच्या क्षेत्रात उपलब्ध होणारे नवे ज्ञान साहित्याकडून अलक्षित राहील, हे सर्वस्वी अशक्य आहे. या ज्ञानाच्या मदतीने साहित्याची अवगाहन शक्ती वाढायला हवी आणि मनोव्यापाराचे सूक्ष्म दर्शन त्याला व्हायला हवे, हे निर्विवाद आहे; पण मनाचे व्यापार उलगडणे म्हणजे आंतरमनातील विकृत सापळे कल्पनेने

गळ लावून सारखे वर काढणे नव्हे. हा उद्योग काही प्रमाणात व्हायला हरकत नाही; पण सर्व साहित्य ह्याच मार्गाने जायला हवे, असे मानू नये."[५] साहित्यातून मानवी अंतर्मनाचा आविष्कार व्हावा; पण तो विकृततेच्या पातळीवर होऊ नये, असे कुसुमाग्रज म्हणतात. कारण साहित्य आणि साहित्यातील अनुभव अखेरतः माणसाच्या जागृत मनाचा आशयपूर्ण अनुभव असतो.

साहित्यनिर्मितीच्या प्रेरणांच्या संदर्भात कुसुमाग्रज गंभीर चिंतन व्यक्त करतात. प्रचलित मतांशी सोयरिक जमविण्यासाठी लेखक जेव्हा आपल्या कृतीचे लेखन आणि संपादन करू लागतात, तेव्हा साहित्याची प्रगती खुंटत असल्याचे कुसुमाग्रज सांगतात. कुसुमाग्रज म्हणतात, "लेखक जेव्हा आपल्या विशिष्ट मतांचा अभिनिवेशाने उच्चार करू लागतात, तेव्हा त्यांच्या लेखनावर या मतांचे बंधन पडू लागते, अपरिहार्याने त्यांच्या निर्मितीच्या कक्षा संकोच पावू लागतात. अखेरी एखाद्या मतवादाच्या सिद्धतेसाठी रचलेली उदाहरणे असे त्याच्या लेखनाचे स्वरूप होते."[६] म्हणजेच एखाद्या संप्रदायाचा पुरस्कर्ता म्हणून साहित्यलेखन केल्यास लेखनातील साहित्यत्व नष्ट होण्याची अधिकाधिक शक्यता असते. संप्रदायाच्या आविर्भावातून होणाऱ्या साहित्यलेखनाचा परिणाम नवोदितांवरही होत असल्याने एकच एक प्रवृत्ती सर्वत्र दिसून येते. त्यामुळे साहित्य हे केवळ सामान्य होऊन बसते. सर्वत्र एकच प्रेरणा असावी अथवा तसा आग्रह धरून साहित्याची निर्मिती केल्यास स्वाभाविकपणे साहित्याला मर्यादा येत असतात. कुसुमाग्रजांनी साहित्य-निर्मितीमागे विविध प्रेरणा असू शकतात, असे म्हटले आहे; मग ते सौंदर्यात्मक, कलात्मक, भावनात्मक, वैचारिक, संशोधनात्मक वा तात्त्विक असो. कुसुमाग्रज म्हणतात, "कलावंताचे संवेदनशील मन जेवढ्या अंगांनी जीवनाला स्पर्श करते, तेवढा त्याच्या अनुभवाचा, प्रेरणेचा आणि अखेरतः साहित्याचाही विस्तार होत असतो."[७] साहित्यलेखन हे विविध प्रेरणांतून झाल्यास साहित्याचा अधिकाधिक विस्तार होत असतो, हे कुसुमाग्रजांच्या विचारांतून लक्षात येते.

सभोवतालच्या प्रत्यक्षाप्रत्यक्ष जीवनाबरोबर प्रस्थापित होणाऱ्या संबंधातून कलावंताचे मन सिद्ध होत असते. त्या जीवनाचा विस्तार जेवढा मोठा, तेवढाच विस्तार मनाचा आणि जेवढा विस्तार कलावंताच्या मनाचा, तेवढाच साहित्याचाही होत असतो. कलावंत काही आग्रही मतवाद्यांच्या कृपाकटाक्षासाठी आपल्या अनुभवाला, व्यक्तित्वाला कातरी लावू लागल्यास साहित्य हे एकसुरी, दुर्बल आणि बेचव झाल्याशिवाय राहत नसल्याचे कुसुमाग्रज सांगतात.

"एखाद्या विचाराशी वा अनुभूतीशी बांधीलकीपेक्षा विचारशक्ती आणि अनुभवक्षमता मुक्त ठेवणाऱ्या 'सामीलकी'चे महत्त्व"[८] कुसुमाग्रजांना अधिक वाटते. कुसुमाग्रज म्हणतात, "सामीलकीत बांधीलकी समाविष्ट असते; पण बांधीलकीची मर्यादा आणि कृपणता तीत असत नाही."[९] त्यांच्या मते, बांधीलकी म्हणजे बांधून घेणे. हे बांधून घेणे जे स्थिर आहे, अचल आहे, गतिमान आहे, त्याच्याशी बांधून घेणे प्रायः अशक्य असल्याचे सांगून लेखकाच्या बाबतीत सामीलकीचे महत्त्व अधिक सार्थ असल्याचे पटवून देतात. सामीलकी म्हणजे घटनांच्या प्रवाहात मनःपूर्वक आणि मनाने सामील होणे. संस्कृतीच्या वरच्या बांधकामाशी नव्हे, तर तिच्या मुळाशी असलेल्या आधारभूत मूल्यांची जाण आणि त्यासाठी आग्रह असणे होय. कुसुमाग्रजांना सामीलकीच्या माध्यमातून लेखकाच्या विचाराचे प्रवाहीपण, लेखकाच्या अनुभवातील प्रेरणांची वैविध्यता अपेक्षित आहे. साहित्यनिर्मितीमागील प्रेरणा प्रस्थापित विचारांची पुनःस्थापना करण्याची राहू नये. एखाद्या संप्रदायाने प्रस्थापित केलेल्या विचारांच्या चौकटीतच लेखकाने अनुभव घेणे कुसुमाग्रजांना मान्य नाही.

साहित्य हे अनुभवातील विविध प्रेरणांनी समृद्ध होते, हे कुसुमाग्रज सांगतात; पण त्याच वेळी केवळ विविध प्रेरणांनी साहित्याची गुणवत्ता सिद्ध होते किंवा साहित्याची गुणवत्ता त्यावर अवलंबून असते, हे त्यांना मान्य नाही. कुसुमाग्रज साहित्याला गुणवत्ता प्राप्त होण्याकरिता निवेदनाला तितकेच महत्त्व देतात. ते म्हणतात, "वाङ्मय म्हणजे अखेरतः निवेदन असते. आविष्काराचीच परिणती निवेदनात होते आणि ते शब्दाच्या साहाय्याने साहित्यरूप धारण करते.... अनुभवाच्या सामर्थ्याबरोबर निवेदनाची समर्थता ज्या प्रमाणात लेखकाजवळ असेल,










त्या प्रमाणात ते साहित्य अधिकाधिक प्रभावी होत असते." [१०] एकंदरच कुसुमाग्रज आशयाबरोबर अभिव्यक्ति-सामर्थ्यालाही महत्त्वपूर्ण स्थान देतात.

कुसुमाग्रजांची साहित्यनिर्मितीमागील प्रेरणा लक्षात घेतल्यास त्यांना साहित्यलेखनाच्या संदर्भात विशिष्ट चौकटीत राहून अनुभव घेणे आणि त्याचा आविष्कार करणे मान्य नाही. अनुभवाच्या विस्तीर्ण कक्षाच त्यांना मान्य आहेत. त्यामुळेच सौंदर्यवादी दृष्टीतून साहित्य-निर्मिती झाली की सामाजिक जीवनातून साहित्यनिर्मिती झाली, यात कोणतीही श्रेष्ठ आणि कनिष्ठ भावना न ठेवता त्यातील अनुभवातील अस्सलता आणि लेखकाने केलेला शब्दाविष्कार याला ते फार महत्त्व देतात. सृष्टीतील सौंदर्य जितके खरे, तेवढेच सामाजिक जीवनातील प्रक्षोभही खरे असल्याचे त्यांना वाटते. श्रद्धा प्रेमावर अथवा परमेश्वरावर जशी असू शकते, तशी ती एखाद्या राजकीय व सामाजिक तत्त्वज्ञानावरही असू शकते. त्यामुळे हे सारे साहित्यात आल्यावाचून राहणार नाही, अशी कुसुमाग्रजांची भूमिका आहे. अमुक येऊ नये वा तमुक येऊ नये याचा आग्रह धरणाऱ्यांना जुमानू नये, असे ते ठामपणे सांगतात. यामागे साहित्यनिर्मितीच्या संदर्भात विविध प्रेरणा असू शकतात. विशिष्ट बांधीलकी स्वीकारून साहित्य निर्माण होण्यापेक्षा सर्वसमावेशक अनुभवसंपन्नतेतून, त्यातील विविध प्रेरणांतून साहित्यनिर्मिती होणे, हेच कुसुमाग्रजांना अपेक्षित आहे. कुसुमाग्रज म्हणतात, "समाज जिवंत राहतो तो त्याच्या संस्कृतीमुळे आणि साहित्य हा संस्कृतीचा एक प्रमुख आधार आहे. किंबहुना साहित्य हे संस्कृतीचे प्रमुख वाहन आहे." [११] साहित्य ही मानवी संसारातील एक समर्थ, किंबहुना सर्वांत अधिक समर्थ अशी वस्तू आहे. समाज हा संस्कृतीच्या वातावरणात जिवंत राहत असतो आणि संस्कृतीच्या प्रवाहात सातत्य ठेवण्याचे कार्य, त्याला प्रगत करण्याचे कार्य साहित्य करीत असते, ही कुसुमाग्रजांची भूमिका आहे.

माणसे मर्त्य असतात; पण त्यांनी उच्चारलेला वाङ्मयीन शब्द मात्र अजरामर असतो, हे सर्वमान्य आहे. वाङ्मय हे निश्चितच संस्कार करत असते. या शब्दांच्या आविष्कारातून तयार झालेल्या ललितकृतीचे अवतारकार्य कोणते, या संदर्भात कुसुमाग्रज म्हणतात, "माणसाच्या मनावर संस्कार करणे हे त्याचे अवतारकार्य होय. संस्कार करणे हा शब्दाचा स्वभाव आहे. साहित्य हे शब्दाश्रित असल्यामुळे ते वाचकाच्या किंवा श्रोत्याच्या मनावर कोणते ना कोणते संस्कार केल्याविना राहत नाही...साहित्याने वटवृक्षाप्रमाणे असावे. चहुबाजूंनी बहरावे. त्याचा संबंध आकाशाशी असावा आणि पृथ्वीवरच्या मातीशीही. त्याने सावली द्यावी आणि सौंदर्यही द्यावे." [१२] कुसुमाग्रजांची साहित्यनिर्मितीच्या मागे हीच भूमिका आहे. साहित्यलेखनविषयक हा महत्त्वपूर्ण दृष्टिकोण आहे. एकंदरच साहित्याच्या माध्यमातून श्रोत्यांवर, वाचकांवर संस्कार होतात किंवा साहित्याचे स्वरूप संस्कारात्मकच असते, हे कुसुसाग्रजांच्या साहित्यनिर्मितिविषयक असलेल्या दृष्टिकोणातील महत्त्वाचे गमक मानावे लागते.

कुसुमाग्रजांच्या साहित्यदृष्टीचा अभ्यास केल्यास खालील निष्कर्ष लक्षात येतात –

१. कुसुमाग्रजांचा साहित्यविचार विखुरलेल्या अवस्थेत, प्रसंगोपात्त दिलेल्या व्याख्यानांमधून, अध्यक्षीय भाषणांमधून आढळतो. त्यामुळे तो एकसंध नाही. त्यात पुनरुक्ती आहे. अभ्यासकाला तो विखुरलेला विचार जुळवून घ्यावा लागतो; तथापि त्या विचाराचे अंतःसूत्र मात्र सर्वत्र समान आहे.

२. अनुभव आणि आविर्भाव ही साहित्याची मुख्य दोन तत्त्वे ते सांगतात.अनुभव प्रत्यक्ष वा कधी अप्रत्यक्ष स्वरूपाचा असतो. अनुभव हाच कलाकृतीत रूपांतरित होत असतो. आविर्भाव अनुभवाला आकार देतो. रूप प्रदान करतो.

३. साहित्याच्या गुणवत्तेच्या संदर्भात अनुभवाच्या विस्तीर्ण कक्षा कुसुमाग्रजांना अपेक्षित आहेत.

४. कलाकृतीचा पहिला संबंध जीवनाशी असल्यामुळे ती साहित्याची नैसर्गिक बांधीलकी दर्शविते; तथापि एखाद्या विचाराशी वा अनुभूतीशी बांधलेल्या बांधीलकीपेक्षा विचार-शक्ती आणि अनुभवक्षमता मुक्त ठेवणाऱ्या 'सामीलकी'चे महत्त्व कुसुमाग्रजांना अधिक वाटते. विचारांना कोणतेही सांप्रदायिक कुंपण नको, असे ते मानतात.

५.कुसुमाग्रज साहित्यातील सामाजिकता मान्य करतात. साहित्याने कधी साक्षात क्रांती होत नाही; पण

त्यामुळे विचार, प्रेरणा व परिवर्तनास साहाय्य प्राप्त होत.

६. साहित्य हे संस्कारसंपन्न असावे. माणसाच्या मनावर सामाजिक आणि सांस्कृतिक संस्कार करणे हे साहित्याचे अवतारकार्य असल्याचे कुसुमाग्रज सांगतात.

**संदर्भ :-**

१.कुसुमाग्रज, 'साहित्यसमीक्षा' (वि.वा. शिरवाडकर गौरवग्रंथ), नासिक, १९७६, पृ. ३०२.
२. तत्रैव, पृ. ३०५.
३. तत्रैव, पृ. ३०६.
४. तत्रैव, पृ. ३०८.
५. तत्रैव, पृ. ३१०.
६. वि. वा. शिरवाडकर, 'रूपरेषा', चेतश्री प्रकाशन, अमळनेर, १९८४, पृ. ४८.
७. तत्रैव, पृ. ५२.
८. तत्रैव, पृ.१०६.
९. तत्रैव, पृ. १०६.
१०. तत्रैव, पृ. ५२-५३
११. तत्रैव, पृ. ५४.
१२. तत्रैव, पृ. ५४-५७.

☆☆☆












ग्रंथसमीक्षण

# मराठीचे आधुनिकीकरण (मराठी वृत्तपत्रांचे योगदान)

श्री. अनंत अडावदकर

मराठीच्या आधुनिकीकरणाचे, भाषाशास्त्रीय दृष्ट्या सुमारे १८-२० वर्षांपूर्वी केले गेलेले हे अध्ययन आणि संशोधन समग्र मराठी साहित्यात आता पदार्पण करून वाचकांसमोर सादर होत आहे. त्या वेळी (डॉ.) विलास चिंतामण देशपांडे यांनी प्रस्तुत अभ्यासावर नागपूर विद्यापीठाकडून आचार्य (पीएच.डी) ही पदवी मिळविली. त्यामुळे हे संशोधन मोलाचे असणार, ह्याबाबत शंका नसावी. मार्गदर्शक (स्वर्गीय) डॉ. सु. बा. कुलकर्णी हेही त्यांच्या क्षेत्रातील अधिकारी व व्यासंगी व्यक्ती म्हणून ओळखले जात. त्यांना श्री. विलास देशपांडे यांच्या 'जनसंवाद' (मास कम्युनिकेशन) विद्याशाखेतील अभ्यासाची जाणीव होती. त्याचमुळे प्रबंधाचे शीर्षक 'मराठी वृत्तपत्रांचे योगदान' असे देऊन त्याची व्याप्ती तेव्हाच निश्चित केली गेली होती. मात्र अनेकांना एकच गोष्ट थोडी खटकू शकते – आणि ती म्हणजे प्रबंधाच्या विषयातील, कालसापेक्षता स्पष्ट करणारा 'आधुनिकीकरणा'चा मुद्दा! १८-२० वर्षांपूर्वीची आधुनिकता, ही आजच्यासाठी, कितपत आणि कशी आधुनिक राहू शकते?

तसा हा मुद्दा थोडासा खटकणारा असला तरी, ग्रंथ प्रत्यक्ष वाचून झाल्यानंतर तो सौम्य ठरत जातो. येथील अभ्यासातून निघालेले कितीतरी निष्कर्ष हे कालनिरपेक्ष स्वरूपाचे असल्याचे वाचकाला वारंवार जाणवते. मग त्यामुळे ग्रंथप्रकाशनाचे प्रयोजन आजही उचितच वाटते.

प्रस्तुत ग्रंथातील लेखकाचे 'मनोगत' हे एकूण पार्श्वभूमी उलगडून सांगते. त्याचमुळे प्रस्तावना लिहिणारी श्री. अरुण साधूंसारखी वृत्तपत्रीय क्षेत्रातील जाणकार व्यक्तीदेखील प्रबंधाची वैशिष्ट्ये नेमकेपणाने मांडत जाते.

ग्रंथाला प्रत्यक्ष हात घालण्यापूर्वी लेखकाचे 'ग्रंथाविषयी'चे परिचयात्मक निवेदन वाचकांचे बोट धरून त्याला ग्रंथाच्या महाद्वारातून आशयाकडे आत नेते. प्रत्यक्ष ग्रंथात एकूण अठरा प्रकरणे आहेत. शेवटी दोन परिशिष्टेही असून त्यांतले दुसरे परिशिष्ट महत्त्वाचे वाटते. ते परिशिष्ट म्हणजे डॉ. विलास देशपांडे यांनी १४/१०/२०१० रोजी लिहिलेला लेख आहे. त्यातून असा निष्कर्ष काढता येतो, की 'प्रबंधलेखनानंतरही लेखकाचा अभ्यास, चिंतन व संशोधन सातत्याने सुरूच होता आणि आहे.' प्रस्तुत ग्रंथातील लहानमोठ्या एकूण प्रकरणांची संख्या तशी जास्त वाटत असली, तरी त्यातील प्रत्येक मुद्द्याची बारीकसारीक चर्चा अगदी सोदाहरण आणि सविस्तर असल्याने त्यात गैर असे काही न वाटता ती ग्रंथाची विशेषताच ठरते.

ग्रंथात मराठी वृत्तपत्रांच्या इतिहासाचा सविस्तर आढावा, त्यातील मजकुरांचे विश्लेषण (अग्रलेख, वृतान्त, निवेदने, जाहिराती, वाचकांच्या प्रतिक्रिया इ.), समाजाची भाषिक अवस्था (बोली व लेखीचे परस्परप्रमाण) अन्य भाषा व भाषिकांच्या संपर्काने होणारी परिवर्तने अशा कितीतरी लहानमोठ्या बाबींची नोंद लेखकाने साक्षेपाने घेतली आहे. उदाहरणे तर इतकी भरपूर दिलेली आहेत की, त्याने पानेच्या पाने व्यापून गेली आहेत.

तरीही त्या सगळ्यांमधून उठून दिसणारा असा एक मुद्दा ठरतो. तो म्हणजे मराठी वृत्तपत्रसृष्टीत जे असंख्य असे थोरथोर संपादक होऊन गेले आहेत, त्यांच्या बाबतीत (परिचयात्मक का असेना) लेखकाने केलेले विवेचन हे लक्षणीय झाले आहे. हे सारे विवेचन प्रस्तुत ग्रंथाच्या तेराव्या प्रकरणात येते. हे प्रकरण म्हणजे सर्वसामान्य वाचकांसाठी ज्ञानाचा खजिनाच ठरते. एकूणच हे प्रकरण म्हणजे प्रस्तुत ग्रंथाचा 'गाभा' म्हणून गौरविले जाऊ शकते.

तसेच भाषाशुद्धी, लेखनशुद्धी, भाषाभिमान किंवा बोलीभाषा, ग्रामीणभाषा व प्रमाणभाषा इत्यादींबाबत लेखकाच्या भूमिका ह्या अभ्यासाधिष्ठितच आहेत. त्यात कुठेही अभिमानाची भावना नाही हे विशेष. लेखकाचे

अनुक्रमणिका

सगळे विवेचन हे वस्तुनिष्ठ आणि तटस्थच झालेले आहे.

वृत्तपत्राप्रमाणेच अन्य दृक्‌श्राव्य प्रसारमाध्यमांचीही दखल येथे थोडीफार लेखक घेतोच. मात्र प्रसारमाध्यमे आणि माहितीतंत्रज्ञानाचा वेग गेल्या काही वर्षांपासून केवढा वाढला आहे! त्याला गवसणी घालणे वर्तमानातील तरुण अभ्यासकांनाच थकवून टाकणारे होते, तर मग?...

तरीही संगणक, दूरचित्रवाणी आणि भ्रमणध्वनी (म्हणजे मोबाईल टेलिफोन) इत्यादींचा अतिरेक आजच्या दिनांकाला भाषादी सर्वच साधनांची एक प्रकारे दाणादाण करीत आहे. त्यामुळे त्याची थोडीतरी दखल येथे घेणे उचित ठरले असते.

तसे प्रस्तुत ग्रंथाचे स्वरूप हे 'ज्ञाननिष्ठ'च असल्याने त्यातील एकूण भाषाशैली ही सर्वसामान्यांसाठी अनेकदा (पारिभाषिक स्वरूपाची व) अनाकलनीय वाटू शकते. (उदा.,पृ.क्र.४५ वरील अतिभाषिक Extra Linguistic हा शब्द.)

तरीही फार मोठी जमेची बाजू म्हणजे पुस्तकाचे बाह्यरूप अगदी सुरेख झालेले आहे. श्री. अजेय गंपावारांचे मुखपृष्ठावरील चित्र मोठे सूचक असून ते पाहणाऱ्याला त्यातून कितीतरी नवनवे अर्थ प्रत्येक वेळा शोधता येतात. सूचकतेने रेखाटलेली तेथील डोळ्यांची व कानांची प्रतिकृती खूप काही सांगतच राहते. इतरत्र बहुधा मलपृष्टावर लेखकाचा परिचय (छायाचित्रासह) दिलेला असतो. येथे तो ढोबळपणा टाकून लेखकाचा परिचय आतल्या भागात ग्रंथसमाप्तीपूर्वी करून दिलेला आहे. मलपृष्ठावर लेखकाचे छोटे छायाचित्र आहे. मात्र परिचय (काळ्या पार्श्वभूमीवर पांढऱ्या स्वच्छ बारीक टाइपात) करून दिला आहे. ३०-३५ ओळींचे हे तीन परिच्छेद डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी यांनी लिहिलेले आहेत. त्यांचा ह्या क्षेत्रातील आधिकार, त्यांची समर्थ शैली व लेखकाविषयीची आस्था हे सर्व येथे प्रकर्षाने लक्षात येते. वाचकांनाही हे लेखन बरेच काही सांगून जाते.

ग्रंथाच्या अखेरीस प्रकाशकाने वाचकांना केलेले अभिप्रायासंबंधीचे आवाहन मात्र, वाचकांना एकदमच व्यवहाराच्या जमिनीवर आणणारे वाटू शकते.

तरीही ग्रंथ हातातून बाजूला करण्यापूर्वी लेखकाचे अभिनंदन केल्याशिवाय राहवतच नाही. त्यासाठी त्याला म्हणावेसे वाटते की, "मित्रा, पुढे चल. तुझा अभ्यास, तुझं चिंतन आणि संशोधन नवनव्या क्षितिजांना स्पर्श करो. हीच तुझ्यासाठी मना-प्राणापासून 'अनंत शुभेच्छा'!"

मराठीचे आधुनिकीकरण (वृत्तपत्रांचे योगदान)
डॉ. विलास चिंतामण देशपांडे,
प्रकाशक : विसा बुक्स, नागपूर,
पृष्ठ संख्या १६+२५४+२
किंमत : रु. १७५/-

☆☆☆

## वाचकांचा पत्रव्यवहार

स.न.वि.वि.

नवभारतच्या जून २०१२ च्या अंकातील प्रा.डॉ. श्री. मा. भावे यांचा 'ग्रंथवेध – मराठी रंगभूमीच्या तीस रात्री, खंड पहिला' हा लेख लेखकाच्या चौफेर व्यासंगाचा व प्रगल्भ समीक्षादृष्टीचा परिचायक आहे. त्यात पान २५ डावा स्तंभ येथे **कलौ आद्यन्तयो स्थितिः** ह्या स्मृतिवचनाला धाब्यावर बसून शिवाजीमहाराजांचे क्षत्रियत्व मान्य केले, असे म्हटले आहे; तथापि **नन्दान्तं क्षत्रियकुलं कलौ आद्यन्तयोः स्थितिः** हे स्मृतिवचन नव्हे. मोगल सम्राट अकबर (मृत्यू इ.स.१६०५) ह्याचे समकालीन काशीनिवासी महाराष्ट्रीय पंडित कृष्ण नृसिंह शेष ह्यांच्या 'शूद्राचार शिरोमणि' ग्रंथातील हे वचन आहे. ३ ऑगस्ट १३४७ रोजी दक्षिणेत बहमनी ही इस्लामी राजसत्ता स्थापन झाली. त्यांच्या धर्मच्छळाला कंटाळून (ह्याविषयी "प्रति संवत्सरी ब्राह्मणांसी। घात करितो जी बहुवसी। याचि कारणे आम्हां। बोलावितसे परियेसा। जातां त्या जवळी आपण। निश्चये घेईल माझा प्राण...." इत्यादी गुरुचरित्रकारांचे पणजे सायंदेव ह्यांनी नृसिंहसरस्वतींना केलेले गुरुचरित्रातील निवेदन प्रसिद्धच आहे.) भट्ट, शेष, मौनी, धर्माधिकारी इत्यादी गोदाकाठची अनेक घराणी बहमनीकृत धर्मच्छळामुळे देशत्याग करून काशीस गेली. शिवप्रभूंच्या राज्याभिषेकासाठी काशीहून आणविलेले गागाभट्ट ह्या भट्ट घराण्यातील होत. त्यांचे पणजे नारायणभट्ट जगद्‌गुरू(जन्म मार्च १५१४) ह्यांनी अकबराचा राजस्वमंत्री राजा तोडरमल काशीस आला असता, तपोबलाने व योगसामर्थ्याने त्याला प्रभावित करून मुसलमानांनी फोडलेला काशीविश्वेश्वर त्याच्याकडून बांधून घेतला. औरंगजेबाने तो पुन्हा फोडला. आपल्या राज्यातील काफीरांच्या सर्व पाठशाळा व देवळे जमीनदोस्त करावी, ह्याविषयीचे औरंगजेबाचे फर्मान (इ.स.१६६९) छापले गेले आहे. काशीच्या पंडितसभेत अग्रपूजेचा मान ह्या भट्टमंडळीचा असे. नारायणभट्ट जगद्‌गुरू ह्यांचे धर्मशास्त्रावर अनेक ग्रंथ आहेत. खुद्द गागाभट्टांकडून शिवप्रभूंनी ग्रंथ लिहून घेतल्याचे प्रसिद्धच आहे. शिवछत्रपतींच्या घराण्यात राज्याभिषेक ह्या भट्टवंशीयाकडून व्हावा, असा परिपाठ होता. आधुनिक महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध राजर्षी कोल्हापूरचे श्री शाहू छत्रपती (मृत्यू १९२२) ह्यांच्या राज्याभिषेकास गागाभट्टांचे वंशज कान्तानाथभट्ट हजर होते. **'रुचंनो धेहि ब्राह्मणेषु, रुचं राजसु नस्कृधि। रुचं वैश्येषु शुद्रेषु मयि धेहि रुचा रुचम्'** म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र ह्या सर्वांना तेजस्विता द्यावी, अशी वेदात प्रार्थना आहे (तैतिरीय संहिता-५,७,६,३-४). पूर्वमीमांसेत यज्ञाधिकार प्रकरणात सर्व वर्णांना यज्ञाचा अधिकार आहे, असा आचार्य बादरींचा पक्ष दिला आहे. ब्रह्मसूत्रे, मीमांसासूत्रे यांत ह्या बादरींचा अनेकदा उल्लेख येतो. बादरी जैमिनींच्याही आधीचे. म्हणजे शूद्रांनाही यज्ञाचा, वेदाध्ययनाचा, सर्व वैदिक कर्मांचा अधिकार आहे, असे म्हणणारे बादरींसारखे आचार्य अगदी वैदिक काळातही होते. सत्याषाढकल्पात म्हटलेले आहे, की रथकार व निषाद यांना अग्निहोत्राचा, दर्शपूर्णमास कृत्ये करण्याचा अधिकार आहे. वेदात चारही वर्णांचे ऋषी आहेत. जसे, ऋग्वेद १०.१७५ चे ऋषी अूर्ध्वग्रावा हे शूद्र होत. यजुर्वेदात शूद्रांना वेदाध्ययनाचा अधिकार असल्याचे (यजुर्वेद २६.२) स्पष्ट आहे. कवष ऐलूष व कक्षीवात हे शूद्र असूनही मंत्रद्रष्टे होते. अश्वमेध यज्ञातील अश्वाचे रक्षक म्हणून सशस्त्र शूद्र अश्वाबरोबर पाठविले जात (आपस्तंभ श्रौतसूत्र-२०.५.१३). रघुनंदनाच्या 'शूद्र कृत्यतत्त्वं' ह्या धर्मशास्त्र ग्रंथात शूद्रान्न घेणे निषिद्ध मानलेले नाही. त्रैवर्णिकांनी शूद्राला स्वयंपाकी ठेवावे, असे आपस्तंभ धर्मसूत्रात सांगितलेले आहे. नंदांपाशी क्षत्रिय संपले, हे कृष्ण नृसिंह शेषांचे म्हणणे खरे नव्हे. इ.स.पूर्व ४थ्या, ५व्या शतकातील ह्या नंदवंशाचा पहिला राजा जैन व बौद्ध परंपरेनुसार न्हावी (नापित) म्हणजे शूद्रच होता. महाबोधिवंस ह्या बौद्ध ग्रंथात त्याचे नाव उग्रसेन आहे. पुराणात ते महापद्म असून तो महानंदीच्या एका शूद्र दासीचा पुत्र होता, असे म्हटले आहे (मत्स्यपुराण-१०१,१७-१८). शिकंदराने भारतावर स्वारी केली, तेव्हा येथे राज्य करीत असलेला शूद्रवर्णीय नंदवंशाचा शेवटचा राजा धननंद ह्याची सत्ता पंजाबच्या सीमेपावेतो होती. त्याच्या सेनादलात २० हजार घोडेस्वार, २ लाख पायदल, २ हजार रथ व ३ हजार हत्ती होते, असे शिकंदराबरोबर आलेल्या

ग्रीक इतिहासकारांनी लिहून ठेवले आहे. मगधसम्राट शूद्रवंशीय महापराक्रमी महापद्मनंदाला भागवतात दुसरा परशुराम म्हणून गौरविले आहे (भागवत-पुराण-१२.१.७-११). ऐक्ष्वाकु, पांचाल, काशी, हैहय, कलिंग, अश्मक, कुरु, मैथिक, शूरसेन, वीतिहोत्र यांची राज्ये जिंकून त्याने एका छत्राखली आणली. इतिहासकालातील तो पहिला महान सम्राट ठरला. नंद व चाणक्याच्या साहाय्याने त्यांचा उच्छेद करून सम्राट झालेला चंद्रगुप्त मौर्य हे शूद्र होते. तात्पर्य, शूद्र सम्राट होते. त्यांची मोठाली साम्राज्ये होती. त्याहीपूर्वी महाभारताच्या सभापर्वात शूद्र राजांचा उल्लेख आहे. म्हणजे अगदी अगदी पांडवांच्या काळीदेखील (इ.स.पूर्व ३०००) शूद्र राजे होते. राजसूय यज्ञप्रसंगी युधिष्ठिराने त्यांना निमंत्रण केले होते (म.भा.,शांतिपर्व ७५,६-१०). दोन हजार वर्षांपूर्वीच्या 'मृच्छकटिक' ह्या सुंदर संस्कृत नाटकाचा कर्ता शूद्रक हा शूद्र राजा होता. शूद्र ऋषी असत, राजेही असत. धर्मसंस्काराचा व धर्मक्रियांचा लोप होत गेल्याने धर्माचार्यांशी संपर्क तुटून गेल्याने ह्या क्षत्रिय जाती हळूहळू शूद्रत्व पावल्या, हे मनुवचन **'शनकैस्तु क्रियालोपादिमाः क्षत्रियजातयः। वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च।।'** (मनुस्मृति, अ.१०) ऐतिहासिक सत्य सांगते.

वरील लेखातील 'ज्ञानेश्वरांसारख्या संन्यांशाच्या मुलांना शास्त्रीमंडळीनी ब्राह्मण म्हणून मान्यता दिली', हे डॉ. भाव्यांचे लिहिणे (पा.२५) खरेच आहे. संन्यासी पुनः गृहस्थाश्रमात आला, तर त्याला धर्मशास्त्रात 'आरुढपतित' अशी पारिभाषिक संज्ञा आहे. आरुढपतितत्वाच्या दोषासाठी देहान्त प्रायश्चित्त धर्मशास्त्रात कोठेही सांगितलेले नाही. असे असताना दक्षिणकाशी पैठण येथील विद्वान ब्राह्मण शास्त्रविरुद्ध निर्णय देतील, हे अजिबात संभवत नाही. तरीही ज्ञानेश्वरांच्या आईवडिलांना ब्राह्मणांनी देहान्त प्रायश्चित्त सांगितल्याने त्यांनी प्रयागास जाऊन गंगेत देहार्पण केले, असा वृत्तान्त महाराष्ट्रात प्रचलित आहे. गणपतकृष्णाजीच्या छापखान्यात सुमारे सव्वाशे वर्षांपूर्वी छापल्या गेलेल्या बीड जिल्ह्यातील वाघेबाभुळगावच्या बाळाबुवा ज्ञानेश्वरीलिखित 'भक्तितत्त्वामृत' ग्रंथात वेगळी माहिती आहे. ज्ञानेश्वरांच्या आईवडिलांनी आयुष्यातील अखेरचे दिवस हिमालयात बद्रीनारायणाच्या वाटेवर तपश्चर्येत घालविले व तेथे त्यांच्या समाध्या आहेत, असे बाळाबुवा लिहितात. ज्ञानेश्वरांचा भाऊ सासवड येथे समाधिस्थ असलेले सोपानदेव ह्यांचा शिष्य प्रकाशनाथ त्याने त्याच्या द्रविड भाषेत ('स्वद्रविड भाषेत वर्णीतसे' असे बाळाबुवांचे शब्द आहेत.) लिहिलेले ज्ञानेश्वरचरित्र बाळाबुवांना त्यांच्या गुरूकडून प्राप्त झालेले होते. त्याच्या आधारे आपण लिहीत असल्याचे ते सांगतात. प्रकाशनाथांची स्वद्रविड भाषा ही महाराष्ट्रसीमेला लागून असलेली कन्नड किंवा तेलगू (त्यातही कन्नड) असण्याचा संभव अधिक. कारण, देवगिरी यादवांच्या राज्यात महाराष्ट्र व कर्नाटक ह्या उभय प्रांतांचा अंतर्भाव होता. यादवांच्या दरबारी मालकांच्यामध्ये सरदार, दरकदार, मुत्सद्दी, योद्धे, सेनापती इत्यादींमध्ये मराठीसह कन्नडिगांचाही भरपूर भरणा होता. यादवांचे कोरीव लेख मराठीपेक्षाही कानडीत अधिक उपलब्ध आहेत. ज्ञानदेवांची कन्नड रचना छापली गेली आहे. तात्पर्य, प्राचीन (मध्ययुगीन) कानडी हस्तलिखितांच्या सूचिग्रंथांमध्ये प्रकाशनाथ नावाचा कोणी लेखक व त्याचे काही ग्रंथ उपलब्ध आहेत काय, याचा शोध घेतला जाणे, ज्ञानेश्वरांच्या ज्ञात चरित्रावर अधिक प्रकाश पडण्यासाठी अगत्याचे आहे.

तलस्पर्शी व्यासंगाधिष्ठित, संतुलित व साक्षेपी (उपर्युल्लिखित) समीक्षालेखासाठी डॉ.भाव्यांचे पुनश्च अभिनंदन! एतत्संबंधित त्यांच्या आगामी दोन लेखांकांविषयाची उत्कंठा त्यांच्या प्रस्तुत लेखाने वाढविली आहे.

– म. शं. वाबगावकर
मुंबई.

☆☆☆

### साभार पोच

१.क्रांतिसंगर- रवींद्र ठाकूर; बळीवंश प्रकाशन,'बळीवंश', नृसिंह पॅलेसच्या मागे, नरहरनगर, नांदेड- ४३१६०५; प्रथमावृत्ती-२०११; पृष्ठे-९५; किं.रु.१००/-

२.अथ मार्जारपुराण- प्रा.व.बा.बोधे; अक्षरबंध प्रकाशन, किरण वसंतराव बोधे,'रविकिरण', नीरा-४१२१०२ ता.पुरंदर,जि.पुणे; प्रथमावृत्ती -२०११; पृष्ठे-१३६; किं.रु.१३०/-

३.सावलीचा शोध- नरेंद्र चपळगांवकर,मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई-४००००४; प्रथमावृत्ती-२०१२; पृष्ठे- १७२; किं.रु.२२०/-

४.प्राचीन भारतीय राजकीय विचार- प्रा. अशोक चौसाळकर, प्रतिमा प्रकाशन, १३६२, सदाशिव पेठ, औंदुबर अपार्टमेन्टस्, नवा विष्णू चौकाजवळ पुणे-३०; प्रथमावृत्ती -२०११; पृष्ठे-२०८; किं.रु.२५०/-

५. जग बदल घालुनी घाव- एकनाथ आवाड, समकालीन प्रकाशन, ८अमित कॉम्प्लेक्स, ४७४, सदाशिव पेठ, पुणे-३०; प्रथमावृत्ती-२०११; पृष्ठे-२११; किं.रु. २००/-

६.सत्यशोधक- गोविंद पुरुषोत्तम देशपांडे, लोकवाङ्मयगृह, भूपेश गुप्ताभवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी मुंबई-४०० ०२५; प्रथमावृत्ती-२०१२; पृष्ठे-८३; किं.रु. १२५/-

७. ज्वालेचे फूल - शरच्चंद्र मुक्तिबोधः व्यक्ती आणि वाङ्मय-रणधीर शिंदे, लोकवाङ्मयगृह, भूपेश गुप्ताभवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई-४०००२५; प्रथमावृत्ती-२०१२; पृष्ठे-१७८; किं.रु.२००/-

८. तळ ढवळताना - लहू कानडे, लोकवाङ्मयगृह, भूपेश गुप्ताभवन, ८५सयानी रोड, प्रभादेवी मुंबई-४०००२५; प्रथमावृत्ती -२०१२; पृष्ठे-१०२; किं.रु.२००/-

९. बापू एकभाषित चिंतनकाव्य - रा.ग.जाधव, साधना प्रकाशन, ४३१ शनिवार पेठ, पुणे-३०; प्रथमावृत्ती २०११; पृष्ठे-१०८; किं.रु.१००/-

१०.कृष्णातीर - श्याम फरांदे, साईश्रद्धा प्रकाशन, २५ सुखनिवास अपार्टमेन्ट, शिवाजी हौसिंग सोसायटी, सेनापती बापट रोड, पुणे-४११०१६; प्रथमावृत्ती-२०१२; पृष्ठे-४६४; किं.रु.४२५/-

११. वाङ्मयीन संस्कृती व सामाजिक वास्तव- विलास सारंग, मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई-४००००४; प्रथमावृत्ती-२०११; पृष्ठे-१०२; किं.रु.१२०/-

१२.शांतवन- अंबिका सरकार, मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई-४००००४; प्रथमावृत्ती-२०११; पृष्ठे-१३६; किं.रु.१५०/-

१३. पूर्णचंद्र तेजस्वी यांच्या निवडक कथा - अनुवाद उमा कुलकर्णी, मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई-४००००४; प्रथमावृत्ती-२०११; पृष्ठे-१७२; किं.रु./-

१४. प्रास- विष्णू जयवंत बोरकर, मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई-४००००४; प्रथमावृत्ती-२०११; पृष्ठे-१८५; किं.रु.२००/-

१५. समीक्षा- मीमांसा- गंगाधर पाटील,मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई-४००००४; प्रथमावृत्ती-२०११; पृष्ठे-२२५; किं.रु.२००/-

१६. हैदराबादची चित्तरकथा- धनंजय कुलकर्णी, मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई-४००००४; प्रथमावृत्ती-२०१२; पृष्ठे-१७९; किं.रु.२००/-

१७.शिल्प- मोनिका गजेंद्रगडकर,मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई-४००००४; प्रथमावृत्ती-२०११; पृष्ठे-१७२; किं.रु.१७५/-

१८.'भूमिका'आणि'उत्सव'-आशा बगे,मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई-४००००४; प्रथमावृत्ती-२०११; पृष्ठे-१४८; किं.रु.१६०/-

१९. कवितेचा शोध- वसंत पाटणकर,मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई-४००००४; प्रथमावृत्ती-२०११; पृष्ठे-२१२; किं.रु.२२०/-

२०. सीमेवरून- मनोहर बाथम-अनु.अनुपमा उजगरे, स्वरंग निर्मिती, १ जयशीतल, जोशीवाडा, चरई, ठाणे-४००६०१; प्रथमावृत्ती-२०१२; पृष्ठे-१०६; किं.रु. १२५/-

## लेखकांचा परिचय

❋ **डॉ. म. अ. मेहेंदळे**

माजी प्राध्यापक, संस्कृत विभाग व माजी सहयोगी प्रमुख संपादक, संस्कृत कोश विभाग, डेक्कन कॉलेज, पुणे; संपादक, महाभारताचा सांस्कृतिक कोश, भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर, पुणे. वैदिक वाङ्मयातील प्रश्नोत्तरे(१९८०), भारतीय द्यूत(१९९०), पू. विनोबाकृत 'ऋग्वेद-सार'चे मराठी भाषांतर (१९८२), जरथुस्त्राच्या गाथांचे मराठी भाषांतर (१९९४). या ग्रंथाचे लेखक; नवभारतात लेखन

पत्ता– बी-४, प्रबोधन हाउसिंग सोसायटी, ६१ए/९-१०, कर्वे रोड, एरंडवणे, पुणे -४११००४

❋ **प्रा. सी. प. खेर**

क्रांतिकारी अर्थशास्त्रज्ञ जॉन मेनार्ड केन्स्, सौ. कुसुम खेर, पुणे (१९९७); राज्यार्थ शास्त्रज्ञ जॉन केनेथ गालब्रेथ, दिलीपराज प्रकाशन,पुणे (१९९९) व जागतिक अर्थशास्त्रचे बदलते संदर्भ, दिलीपराज प्रकाशन, पुणे (२००४) ही पुस्तके प्रसिद्ध

***पत्ता :*** बी.७, (पूर्व), वृंदावन सोसायटी,रेज हिल्स रोड, पुणे-४११०२० दूरध्वनी : ०२०-२५५६६०१८२.

❋ **डॉ. वैशाली श्रीकृष्ण भालसिंग**

मराठीच्या निवृत्त प्राध्यापिका. एम. ए. पीएच. डी. (मराठी); नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, नाशिक या संस्थेत ३० वर्षे प्राचार्य. पुणे विद्यापीठाचा उत्कृष्ट प्राचार्य म्हणून पुरस्कार. साहित्य व शिक्षण यांवर लेखन.

***पत्ता :–*** प्लॉट नं.१८, नंदनवन कॉलनी, कोहिनूर मंगल कार्यालयासमोर, सावेडी, अहमदनगर- ४१४००३

दूरभाष : (०२४१) २४२३२२०.

❋ **डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी**

प्रख्यात संवाद-माध्यमतज्ज्ञ असून राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाच्या जनसंवाद विद्या विभागाचे माजी विभागप्रमुख व गोखले संवाद व माध्यम संशोधन संस्थेचे माजी संचालक आणि संवादशास्त्र-जनसंवाद-माध्यम-पत्रकारिता यांबाबतच्या अनेक ग्रंथांचे लेखकही आहेत. या ज्ञानशाखेतील अनेक अभ्यासक्रमांची त्यांनी रचना केली असून जनसंवाद विद्या अभ्यासमंडळाचे ते अध्यक्षही राहिले आहेत.

***पत्ता :–*** १०५, संकल्प सहनिवास, ४० खरे टाउन, धरमपेठ, नागपूर - ४४० ०१०.

दूरध्वनी - ०७१२-२४२५७१५

❋ **श्री. विजय रैवतकर**

संशोधक विद्यार्थी स्नातकोत्तर मराठी विभाग, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर

पत्ता- मु.पो. गणखैरा, ता. कोरेगाव, जि. गोंदिया (महाराष्ट्र)-४४१८०१

फेलो , सांस्कृतिक मंत्रालय भारत सरकार, दिल्ली. भ्रमणध्वनी - ९८२३८७९२०६

❋ **डॉ. अनंत अडावदकर**

एम.ए.पीएच.डी; निवृत्त संचालक, आकाशवाणी, नागपूर.

पत्ता - १/३, एम. आय. जी, 'अभीष्ट' त्रिमूर्तीनगर, नागपूर- ४४००२२ दूरध्वनी - ०७१२-२२२२५०८

अनुक्रमणिका

# लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी. आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

अनुक्रमणिका

कव्हरच्या आतील ३ नं. पेज





हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून
सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

